# सभाषणांतील वाक्यें.

मूळ इंग्रजी ठेवून त्यांचें मराठी भाषांतर


## वामन कृष्ण शास्त्री गद्रे

ह्यांनीं केलें,


1448

तें इंग्रजी सुद्धां


मुंबईत.

बाबू मोरेश्वर हळबे यांनीं

"इंदुप्रकाश" छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति तिसरी.


---



---


सन १८७२.

शके १७९४.

किंमत १॥ रुपया.

To,

EDWARD I. HOWARD, Esq., M.A.,

**DIRECTOR OF PUBLIC INSTRUCTION**

**IN THE BOMBAY PRESIDENCY,**

This Work

IS DEDICATED

IN ACKNOWLEDGMENT OF HIS LIBERAL PATRONAGE

OF VERNACULAR LITERATURE.

BY HIS MOST OBEDIENT AND HUMBLE SERVANT,

THE TRANSLATOR.

# प्रस्तावना.

आज फार वर्षांपासून इंग्रजी ग्रंथांचीं महाराष्ट्र भाषेंत पुष्कळ भाषांतरें झालीं व होत आहेत, तथापि इंग्रजी भाषेंतील बोलण्याच्या रूढीचीं वाक्यें व वाक्यरचनेच्या अनेक पद्धति व अनेक विषयांचे शब्द कोणत्या ठिकाणीं कसे उपयोगांत आणावे, अशा प्रकारची केवळ डाकूतर उइल्सन साहेब ह्यांनीं केलेली इंग्रजी व मराठी वाक्यावलि, तशीच मयत प्रोफेसर ग्रीन साहेब ह्यांनीं केलेली इंग्रजी व गुजराथी वाक्यावलि, हे दोन ग्रंथ मात्र पाहण्यांत येतात, व त्यांचा उपयोग किती आहे हें त्यांचे आवृत्तींवरून सहज लक्षांत येईल. माझे मनांत आलें कीं, वरील वाक्यावलीचे ग्रंथांशिवाय दुसरा एखादा ग्रंथ, ज्यांत अनेक प्रकरणांतील शब्दांचा संग्रह असेल, अशा प्रकारच्या ग्रंथाचें मराठींत भाषांतर झाल्यास प्रस्तुत फार उपयोग होईल. असा विचार करीत असतां शेट डोसाभाई सोराबजी मुनशी ह्यांनीं **इडयुमाटिकल् सेन्टेन्सिस** ह्या नांवाचा ग्रंथ सन १८४३ सांत छापून प्रसिद्ध केला होता, तो माझे पाहण्यांत आला. त्यांत इंग्रजी वाक्यें होतीं तीं फार सुरस व उपयोगी असून त्यांचें त्यांनीं हिंदुस्थानी, गुजराथी आणि फारशी अशा भाषांत मात्र भाषांतर केलें आहे. त्याचें मराठी भाषांतर केलें असतां फार उपयोगी पडेल असें वाटल्यावरून मी तीं इंग्रजी वाक्यें ठेवून त्यांचें मराठींत भाषांतर केलें आहे त्याचे सहा भाग आहेत ते येणेंप्रमाणेः—

भाग १ इंत्रोदक्तरी ( उपोद्घातरूप किंवा पारिभाषिक. )
" २ मिलितरी ( लश्करी. )
" ३ जुदिशियल ( न्यायप्रकरणीं )
" ४ मरकंताइल ( व्यापारसंबंधी. )
" ५ मेदिकल ( वैद्यकसंबंधी. )
" ६ मिसेलेनिअस ( अनेकजातीय. )

आणखी ह्यांत पत्रें लिहिण्याचे मायने, कोर्तमार्शलचा नमुना, रिपोर्त, जबानी, इत्यादिक इंग्रजींत त्यांचे भाषांतरासुद्धां घातले आहेत. ह्याविषयीं मला ज्यांनीं सर्तिफिकितें दिलीं आहेत तींही ह्यांत दाखल केलीं आहेत. ह्यांत कोठें चुका वगैरे असतील त्यांची सुज्ञांनीं क्षमा करावी.

हें पुस्तक मेहेरबान मेजर क्यांदी साहेब मराठी त्रान्सलेतर, एजुकेशन दिपार्तमेंत, ह्यांनीं परोपकारार्थ पुष्कळ श्रम घेऊन शोधिलें आहे व त्यांचे पंडित रा. रा. परशुरामपंत तात्या गोडबोले ह्यांनींही शोधण्यास बरीच मदत केली आहे व मेहरबान दैरेक्तर आफ पब्लिक् इन्स्त्रक्शन ह्यांनीं हें पुस्तक पसंत केल्यावरून छापिलें आहे.

---

या तिसऱ्या आवृत्तींच्या वेळेस ज्या कांहीं चुका आढळल्या त्या शुद्ध करून ही छापली आहे.

# OPINIONS ON THE WORK.

At the request of the author of this HELP TO CONVERSATION, I have looked over a considerable portion of the work. The phrases which it contains have been well rendered into Maráthi; and the author deserves every encouragement to lay the fruit of his labours before the public.

JOHN WILSON.

*Bombay, 18th August* 1862.

---

I like the style in which Mr. Waman Krishna has compiled his HELP TO CONVERSATION, and believe it will prove a useful aid to persons learning either English or Maráthi.

*Elphinstone Institution,* *Bombay, 6th September* 1862. } W. HENRY SMITH, Head Master, Elphinstone Institution.

---

HELP TO CONVERSATION.

In English and Maráthi, by Waman Krishna Shastri.

This is a book the advent of which should be welcomed by every student of the Maráthi language, who will find it to be a work easily undestood, and at the same time, most practically useful.

From the variety of subjects which it embraces, the reader is supplied with an excellent vocabulary of words, while the sentences are suggestive of topics which may be enlarged on by the teacher with great benefit to the pupil.

One great merit of the work is the avoidance, generally speaking, of Sanskrit words which present great difficulties to the learner, and which when he has with infinite pains made himself master of, he often finds to his disgust are unintelligible to the Maráthi-speaking population. Our author deserves the thanks of his countrymen as well as of strangers as the former are likely to reap two advantages from his book, the first that the sentences being highly idiomatical, their attention cannot fail to be drawn to the difference between the English and the Maráthi idiom, the second, that they will be furnished with phrases calculated to afford them the greatest assistance in their intercourse with Europeans. We hope that Mr. Waman Krishna Shastri may receive such a reward as his praiseworthy exertions richly merit.

EDMUND BURKE, B. A.,
Acting Principal, Elphinstone Central School.

---

No. 1867 of 1863.

*General Department.*

Memorandum.

In reply to his letter dated 23rd November 1863, Mr. Waman Shastri Gudray is informed that no opinion was given by the Oriental Translator on his work; but as Secretary to the Civil and Military Examination Committee, Mr. Venayek Wassoodew reported that the work was a good collection of idiomatic sentences, and would prove useful to persons studying Maráthi.

J. B. RICHEY,
Offg. Under Secretary to Government.

Bombay Castle, 4th December 1863.

---

No. 108 of 1863-64.

*Bombay Office of the Director of Public Instruction.*
*19th May* 1863.

Memo:

In reply to his letter dated 15th Instant, Mr. Waman Krishna Shastri is informed that the Director will be happy to accept the dedication of the work in question.

2. A copy of Major Candy's report No. 157 dated 29th April 1863 is herewith forwarded as requested.

EDWARD I. HOWARD,
Director of Public Instruction.

To, Mr. Waman Krishna Shastri Gudray.

---

No. 157 of 1862-63.

*Sion Fort, Bombay Office of the M. Translator, E. D.,*
*29th April* 1863.

In obedience to the above instructions, I have the honour to make the following further report on Mr. Waman Shastri Gudray's work.

The work has been carefully revised, and the faults I pointed out have been corrected.

My former remark that the book seems more calculated to be useful to Europeans learning Maráthi than to Natives learning English still holds good; but the work will doubtless be useful to students in our colleges and to the senior scholars in our schools.

Many of the renderings are very good, while others are only middling; but on the whole, I think, the work is well worthy of your patronage.

The compiler should take great care in carrying his work through the press to secure correct orthography.

The Book is herewith returned.

( Signed ) T. CANDY,
Maráthi Translator.

# HELP TO CONVERSATION.

## INTRODUCTORY PHRASES.

| ENGLISH. | मराठी. |
|---|---|
| 1 This is a useful book. | हें पुस्तक उपयोगी (कामाचें) आहे. |
| 2 You are of no use to me. | तूं माझ्या कांहीं कामाचा नाहींस. |
| 3 If you do such a thing again, you will be beaten. | जर फिरून असें काम करशील तर मारच खाशील. |
| 4 Choose what is right, and shun what is wrong. | रास्त असेल तें पतकरा, गैररास्त असेल त्याचे वाटेस जाऊं नका. |
| 5 Had I been you, I would not have done so. | जर मी तुमच्या ठिकाणीं असतों तर असें न करतों. |
| 6 I am chosen by Government for that Office. | त्या कामासाठीं सरकारानें माझी योजना केली आहे. |
| 7 If you had come yesterday, you would have got your pay. | तुह्मी काल आलां असतां तर तुमचा पगार तुह्मांला मिळाला असता. |
| 8 I waited for you till I was tired. | मी तुमची वाट पाहून पाहून थकलों. |
| 9 You kept me waiting a long time yesterday. | काल तुह्मीं मला फार वेळ वाट पहावयास लाविलें. |
| 10 How long is it since you saw him? | त्यास भेटून तुह्मांला किती दिवस झाले? |
| 11 How long is it since this horse was ridden? | किती दिवस झाले, या घोड्यावर कोणी बसलें नाहीं? |
| 12 How long has he been married? | त्याचें लग्न होऊन किती दिवस झाले? |
| 13 How long is it since this house was occupied? | हें घर कधींपासून खालीं आहे? |

| | |
|---|---|
| 14 She said that she was his daughter. | ती ह्मणाली कीं, मी त्याची मुलगी आहें. |
| 15 Ten days hence I shall have lived three years in this house. | मला या घरांत राहून दहा दिवसांनीं तीन वर्षें पुरीं होतील. |
| 16 He says he will not come. | तो ह्मणतो कीं, मी येणार नाहीं. |
| 17 Let him do his worst, he can but kill me. | त्याच्यानें होईल तें तो करो. फार करील तर मारून टाकील. इतकेंच. |
| 18 Tell him, if he does not come when I desire him, he will be dismissed. | त्याला सांग कीं, मीं बोलाविलें असतां तूं न येशील तर तुझी चाकरी जाईल. |
| 19 Did the horse run away with you? | घोडा तुह्मांला घेऊन पळून गेला काय? |
| 20 My servant ran away with my money. | माझा चाकर माझा पैसा घेऊन पळाला. |
| 21 He did it unintentionally. | त्यानें तें न जाणतां केलें. |
| 22 He did it purposely. | त्यानें तें जाणून बुजून ( बुद्ध्या ) केलें. |
| 23 This woman is pregnant. | ही स्त्री गरोदर आहे. |
| 24 When I require you, I will send for you. | जेव्हां मला तुमचें काम पडेल तेव्हां मी तुह्मांस बोलावणें पाठवीन. |
| 25 What day of the month is it? | आज कोणती ( कितवी )तारीख आहे? |
| 26 Does your horse shy? | तुमचा घोडा बुजतो काय? |
| 27 What is he to you? | तो तुमचा कोण लागतो? |
| 28 I would do it if I could. | जर माझ्यानें तें करवतें तर मी करतों. |
| 29 I could if I would. | माझी इच्छा असती तर माझ्यानें तें करवतें. |
| 30 Allow him to come. | त्याला येऊं दे. |
| 31 Light every other lamp. | एकेक दिवा सोडून एकेक लावीत जा. |
| 32 He was not yet arrived. | तो आजून येऊन पोंहचला नाहीं. |
| 33 I am sorry to hear of your departure. | तुमचें जाण्याचें वर्तमान ऐकून मी दुःखी आहें. |

| | |
|---|---|
| 34 Do not wait for me. | माझी वाट पाहूं नका. |
| 35 I left my hat in the palanquin. | माझी टोपी पालखींत (मेण्यांत) राहिली. |
| 36 I have lost my knife. | माझा चाकू हरवला. |
| 37 Follow your nose. | नाकासमोर जा. |
| 38 How many times have I told you to do this. | हें काम करण्यासाठीं मी तुह्मांस किती वेळां सांगितलें. |
| 39 Now remember and do so at all times. | आतां आठवण धरून सर्वकाळ असेंच करीत जा. |
| 40 I repent of having done so. | असें केल्याचा मला पश्चात्ताप झाला आहे. |
| 41 If you had not been ashamed of your name, you would have signed this letter. | जर तुह्मांस आपल्या नांवाची लाज नसती तर तुह्मीं या पत्रावर सही केली असती. |
| 42 She is no better than she should be. | ती जशी आचरणाची असावी तशी नाहीं. |
| 43 I would rather die than beg. | भीक मागण्यापेक्षां मरण पुरवेल. |
| 44 They are relating their circumstances to the king. | ते आपली हकीकत राजास सांगत आहेत. |
| 45 They slew their father on the road. | त्यांनीं मार्गावर आपले बापास ठार मारिलें. |
| 46 Do tell me what you heard them saying. | तुह्मीं त्यांना काय बोलतांना ऐकिलें तें सांगाच. |
| 47 There is a thick fog this morning. | आज फार धुकें आलें आहे. |
| 48 A great deal of dew fell last night. | काल रात्रीस फार दहिंवर पडलें. |
| 49 Did these people arrive yesterday or the day before? | हे लोक काल आले किंवा परवां? |
| 50 This plan is apparently the best. | हा बेत दिसण्यांत तर सर्वांपेक्षां चांगला दिसतो. |

| | |
|---|---|
| 51 There is no use in contesting the matter. | ह्या गोष्टीविषयीं वाद करण्याचा कांहीं उपयोग नाहीं. |
| 52 An arrow buried itself in his side. | त्याचे कुशींत तीर जाऊन बसला. |
| 53 He suspected something extraordinary. | त्याला कांहीं विलक्षण गोष्टीचा अंदेशा आला. |
| 54 He looked in at the house door. | घराच्या दरवाजांतून त्यानें डोकावून पाहिलें. |
| 55 He passed through the Sally Port. | तो किल्ल्याचे दिंडींतून (बोगद्यांतून) पळून गेला. |
| 56 He bit her ear. | तो तिच्या कानाला डसला. |
| 57 He does not hesitate to do this. | तो हें करण्यास कांकूं करीत नाहीं. |
| 58 To preserve one's self-respect is essential. | आपल्या मनांत आपला मान राखावा हें आवश्यक आहे. |
| 59 He suddenly fell on them (attacked.) | त्यानें अकस्मात् त्यांवर घाला घातला. |
| 60 There is no saying what the result may be. | ह्याचा काय परिणाम होईल हें सांगवत नाहीं. |
| 61 He got out of the way as quickly as he could. | त्याच्यानें करवली तितकी त्वरा करून तो रस्त्यांतून एकीकडे झाला. |
| 62 It has become useless. | तें निकामी झालें आहे. |
| 63 I foretold that. | असें होईल हें मीं पूर्वींच सांगितलें होतें. |
| 64 I like this place very much. | मला ही जागा फार पसंत आहे. |
| 65 To persevere in a work is essential to success. | कार्य सिद्धीस नेण्यास त्याची पाठ पुरविणें अवश्य आहे. |
| 66 She is passably handsome. | ती सुमाराची सुंदर आहे. |
| 67 He could not contain his joy. | त्याच्या पोटांत हर्ष मावेना. |
| 68 I do fifty times more work than you. | मी तुमच्यापेक्षां पन्नासपट जास्त काम करितों. |

| | |
|---|---|
| 69 I will do that with all my heart. | तें काम मी आपले मनापासून करीन. |
| 70 He owes a great deal of money to the Bazaar people. | त्यास बाजारचे लोकांचा पुष्कळ पैसा देणें आहे. |
| 71 It is a long time since he paid me a visit. | तो माझ्या भेटीला येऊन पुष्कळ दिवस झाले. |
| 72 He has more than enough. | त्याजवळ पुरून उरे इतकें आहे. |
| 73 Do not interfere with him. | त्याच्या कामांत पडूं नको. |
| 74 He leapt into the well. | त्यानें विहिरींत उडी टाकिली. |
| 75 He leapt out of the well. | तो विहिरींतून उडी मारून बाहेर आला. |
| 76 He cut him in two. | त्यानें त्याचे दोन तुकडे केले. |
| 77 He recognised him. | त्यानें त्यास ओळखिलें. |
| 78 He had no difficulty in doing so. | त्याला असें करण्यास कांहीं कठीण पडलें नाहीं. |
| 79 Beat him soundly with a stick. | त्याला काठीनें रगडून मार. |
| 80 There is nothing wrong in his doing so. | त्याचें असें करणें कांहीं गैर वाजवी नाहीं. |
| 81 He aggravated his distress. | त्यानें त्याचें दुःख वाढविलें. |
| 82 He is better than you. | तो तुझ्यापेक्षां बरा आहे. |
| 83 The dog barked at the man. | कुतरा त्या माणसावर भोंकला. |
| 84 Go about your business. | तूं आपल्या कामास जा. |
| 85 He petitioned him. | त्यानें त्यास अर्ज केला. |
| 86 They overtook him. | त्यांनीं त्यास आटपलें. |
| 87 I entreat you to do this very secretly. | मी विनंती करून सांगतों कीं, हें काम तुह्मीं गुप्तपणें करा. |
| 88 I cannot conquer him. | माझ्यानें त्यास जिंकवत नाहीं. |
| 89 A man is come for service. | कोणी माणूस चाकरीसाठीं आला आहे. |

| | |
|---|---|
| 90 Five days hence I am going to Bombay. | पांचें दिवसांनंतर मी मुंबईस जाणार आहें. |
| 91 The hen laid eggs. | कोंबडीनें आंडीं घातलीं. |
| 92 Why did you refuse your food ? | तुह्मीं अन्न कां वर्जिलें ? |
| 93 Do not let him want any thing. | त्याला कोणतेही पदार्थाची वाण पडूं देऊं नको. |
| 94 He struck out into the river. | तो कांठ सोडून नदीचे मध्यभागाकडे पोंहत चालला. |
| 95 I am not pleased with him. | त्याजवर माझी खुशी नाहीं. |
| 96 A traveller was passing by. | कोणी वाटसरू जवळून जात होता. |
| 97 Carry it off with a joke. | ही गोष्ट हंशावर ने. |
| 98 Let every one look out for himself. | ज्यानें त्यानें आपलें पहावें. |
| 99 He fled for his life. | तो जीव घेऊन पळाला. |
| 100 I made a minute investigation. | मी बारीक रीतीनें चौकशी केली. |
| 101 No one could equal him in leaping. | उडी मारण्यांत त्याची कोणाच्यानें बरोबरी करवेना. |
| 102 He conceals it all in his breast. | तो आपले पोटांत हें सर्व गुप्त ठेवितो. |
| 103 he is not one of us. | तो आमच्यांतला नाहीं. |
| 104 The timber was exposed for sale. | इमारती लांकडें विकण्यासाठीं ठेविलीं होतीं. |
| 105 What will you take for this ? | ह्याचें तुह्मीं काय घ्याल ? |
| 106 I will give it you into the bargain. | हें तुला वर मुफत देईन. |
| 107 His lodging is inconvenient. | त्याचें बिऱ्हाड गैर सोईचें आहे. |
| 108 They were formerly acquainted. | त्यांची पूर्वीची ओळख होती. |
| 109 We spent an hour pleasantly. | आह्मीं एक तास आनंदानें घालविला. |
| 110 We do not require him (or we can do without him.) | आह्मांस त्याची कांहीं गरज नाहीं, (अथवा त्याच्यावांचून आमचा खोळंबा नाहीं.) |

| | |
|---|---|
| 111 We cannot do without him. | त्याच्यावांचून आमचें कांहीं चालणार नाहीं. |
| 112 He has one foot in the grave. | त्यानें मरणाचें प्रस्थान ठेविलें. |
| 113 He was at the point of death. | तो मरायाला टेंकला होता. |
| 114 The door was left open by the servants. | चाकरांनीं दार उघडें टाकिलें होतें. |
| 115 They began to raise objections. | ते तकरारी घेऊं लागले. |
| 116 This field is fit to cut. | हें शेत कापणीचे बेतास आलें आहे. |
| 117 If he should come here then inform me. | जर तो एथें आला तर मला कळीव. |
| 118 How often have you been there? | तुह्मीं किती वेळां तेथें गेलां आहां? |
| 119 How many days will this examination last? | ही परीक्षा किती दिवस चालेल? |
| 120 How many miles can you walk in a day? | एके दिवसांत तुमच्यानें किती मैल चालवेल? |
| 121 Come when you can. | बनेल तेव्हां या. |
| 122 I have had this Palanquin for two years. | हा म्याना दोन वर्षे मजजवळ आहे. |
| 123 I walked as far as I could. | माझ्यानें चालवलें तेथवर मी चाललों. |
| 124 He was in the habit of coming to my house. | तो माझ्या घरीं येत असे. |
| 125 I will lodge a complaint against him. | मी त्याजवर फिर्याद करीन. |
| 126 Do me justice. | माझा इनसाफ करा, (माझे विषयीं वास्तविक असेल तें पाहा.) |
| 127 I wish I had seen him. | मी त्याला पाहिलें असतें तर बरें होतें. |
| 128 What do you mean by it? | ह्यांत तुमचा उद्देश काय? |
| 129 How many days will this tea last? | हा चहा किती दिवस पुरेल? |

| | |
|---|---|
| 130 I have been in this country at least two years and a half. | ह्या देशांत मला निदान अडीच वर्षें तरी झालीं आहेत. |
| 131 I missed him on the road. | रस्त्यांत त्यांची माझी चुकामूक पडली. |
| 132 I cannot afford so much. | माझ्यानें इतकें देववत नाहीं. |
| 133 What sort of grain is produced in this country? | ह्या देशांत काय काय धान्य पिकतें? |
| 134 What is the price of a Furra of rice. | एक फरा तांदळांस काय किंमत पडते? |
| 135 Do the agriculturists carry on any traffic? | शेतकरी लोक कांहीं व्यापार करितात काय? |
| 136 Why do these people walk about armed? | हे लोक हत्यारबंद होऊन कशासाठीं फिरतात. |
| 137 Where were you born? | तुमचा जन्म कोठें झाला? |
| 138 He is noted for that. | त्याविषयीं तो फार प्रख्यात आहे. |
| 139 The appointed time is past. | नेमलेला वेळ होऊन गेला (मुदत टळली). |
| 140 I saw what was going on. | काय चाललें होतें, तें माझ्या पाहण्यांत आलें. |
| 141 Good men are scarce in the world, but bad men are plentiful. | ह्या जगांत चांगलीं मनुष्यें थोडीं आहेत, परंतु वाईट फार. |
| 142 Why were you so late to-day? | आज तुह्मांस इतका उशीर कां लागला? |
| 143 There is a great deal of water in that puddle. | त्या डबक्यांत पाणी पुष्कळ आहे. |
| 144 Pluck that flower. | तें फूल तोड. |
| 145 He tripped and stumbled. | त्याला ठेंच लागून तो अडखळला. |
| 146 What is the matter with you? | तुह्मांला काय होतें? |
| 147 You are very lazy. | तूं फार आळशी आहेस. |
| 148 A friend in need is a friend indeed. | जो वेळेस कामास पडतो तोच मित्र खरा. |

| | |
|---|---|
| 149 There is no comparison between them. | त्याची ह्याची कांहीं बरोबरी नाहीं. |
| 150 Keep a civil tongue in your head. | तोंड संभाळून ऐस. |
| 151 The water soaks into the walls. | पाणी भिंतींत मुरतें. |

# MILITARY PHRASES.

| ENGLISH. | मराठी. |
|---|---|
| 1 The enemy were defeated, many of their men were killed and wounded, their guns were taken, and baggage plundered. | शत्रु पराभव पावले, त्यांचे पुष्कळ लोक मारले गेले व जखमी झाले, त्यांच्या तोफा घेतल्या व त्यांचें सर्व बुणगें लुटलें गेलें. |
| 2 When troops march through a district, the inhabitants go to the Collector and make false complaints that the sepoys have plundered them. | जेव्हां एखाद्या परगण्यांतून लष्कर जातें तेव्हां तेथील राहणारे लोक कलेक्टर साहेबापाशीं जाऊन खोटी फिर्याद करितात कीं, शिपाई लोकांनीं आह्मांस लुटलें. |
| 3 Had the detachment marched one day earlier, it would have fallen in with the Regiment. | जर ती तुकडी एक दिवस अगोदर कूच करती, तर तिची व पलटणीची गांठ पडती. |
| 4 If the sepoy had not gone to the rampart, he would not have fallen into the ditch. | जर तो शिपाई किल्ल्याचे तटावर गेला नसता, तर खंदकांत पडला नसता. |
| 5 When I ordered those sepoys to advance, they threw down their arms and refused to stir a step further, until they received their arrears of pay. | जेव्हां मी त्या शिपाई लोकांस पुढें चालण्यास हुकूम केला तेव्हां त्यांनीं हत्यारें फेकून दिलीं आणि ते ह्मणूं लागले कीं, आमचा चढलेला पगार आम्हांस मिळेपर्यंत आह्मी एक पाऊल पुढें टाकणार नाहीं. |
| 6 That sepoy sold his kit, for which crime he was confined in the Coujee House for six months, and forfeited half his monthly pay for a year. | त्या शिपायानें आपलें सामान विकलें, त्या अपराधाकरितां तो सहा महिनेंपर्यंत कांजी हौसांत कोंडून टेविला होता आणि एक वर्षपर्यंत त्याचा अर्धा पगार दंडाबद्दल बंद केला. |

| | |
|---|---|
| 7 Did he draw his bayonet from the scabbard on the parade ground? | त्यानें कवायतीचे जाग्यावर आपली संगीन म्यानांतून काढली होती काय? |
| 8 He whirled his sword three times round his head, and then made a cut at me, but I warded it off with a stick. | त्यानें आपली तरवार तीन वेळ डोक्याभोंवतीं फिरवून मजवर एक वार केला, परंतु मी काठीनें त्याचें निवारण केलें. |
| 9 The recoil of the gun was so violent that the carriage was overturned by it. | तोफ सोडली तेव्हां ती पाठीमागें इतक्या जोरानें हटली कीं, तिची गाडी उलथून पडली. |
| 10 I should have had a pension of ten Rupees a month had I not been dismissed the service. | जर मी सरकारचे चाकरींतून बरतर्फ झालों नसतों तर मला दरमहा दहा रुपये पेनशन मिळालें असतें. |
| 11 He endeavoured to influence the Subedar in the Court of Requests by a bribe. | कोर्ट आफ् रिकेस्टांत त्या मनुष्यानें सुभेदारास लांच देऊन वळविण्याचा उद्योग केला. |
| 12 Do you think that in dealing with those people, mildness will be more efficacious than severity; or that seeing their disposition it may be advisable to make an example by hanging some of the leaders? | त्या लोकांबरावर कडकपणा न धरितां सौम्यपणानें चालावें अथवा त्यांचा स्वभाव पाहून दुसरे लोकांस दहशत पडावी ह्मणून त्यांतील कित्येक पुढारी ( प्रमुख ) लोकांस फांशीं द्यावें, ह्याविषयीं तुह्मांस कसें वाटतें? |
| 13 There is no need of further proof; he is a *spy*, take him and hang him up to the nearest tree. | आतां जास्ती पुराव्याची कांहीं गरज नाहीं, तो हेर आहे, त्याला धरून जवळचे झाडावर फांशीं द्या. |
| 14 As the enemy retreated, we advanced. | जसजसे शत्रु पाठीमागें हटले तसतसे आह्मी त्यांवर पुढें सरसावलों. |
| 15 To what corps do you belong? | तुह्मीं कोणत्या पलटणींत आहां? |

| | |
|---|---|
| 16 How many years have you been with it? | तुम्हांला त्या पलटणींत राहून किती वर्षें झालीं ? |
| 17 What service have you seen? | कोणकोणती लढाई तुम्हीं पाहिली ? |
| 18 Do the Native Officers for the most part behave respectfully? | नेटिव अमलदार लोक बहुतकरून मर्यादेनें चालतात काय ? |
| 19 When you were on service, had you any fighting or not? | जेव्हां तुम्हीं लढाईचे कामावर गेलां होतां तेव्हां तुम्हीं कांहीं लढाई केली किंवा नाहीं ? |
| 20 Did the enemy commence the attack or did you? | प्रथम शत्रूनें तुम्हांवर हल्ला करण्यास आरंभ केला, किंवा तुम्हीं त्यांवर केला ? |
| 21 How were the enemy chiefly armed? | मुख्यत्वेंकरून शत्रूंचीं हत्यारें कोणत्या प्रकारचीं होतीं. |
| 22 Did they show much bravery in defending the pass or not? | त्यानीं खिंडीचें रक्षण करण्याविषयीं आपलें शौर्य्य पुष्कळ दाखविलें कीं नाहीं ? |
| 23 How many were killed and wounded? | किती लोक पडले आणि किती जखमी झाले. |
| 24 After the enemy fled, to what distance did you pursue them? | शत्रु पळून गेला त्यावेळेस तुम्हीं त्याचा पाठलाग कोठपर्यंत केला ? |
| 25 How many prisoners were taken? | त्या युद्धांत किती लोक पाडाव केले होते ? |
| 26 Were there any women present and what were they doing? | त्यांत कांहीं स्त्रिया होत्या काय, आणि त्या काय करीत होत्या ? |
| 27 In what manner did the enemy encamp, was there any stockade and how was it constructed? | शत्रूनें आपली छावणी कोणत्या रीतीनें केली होती, आणि तेथें कांहीं लकडकोट (मेढेकोट) होता. काय आणि त्याची बांधणी कशी होती ? |

| | |
|---|---|
| 28 If the enemy had stockaded themselves, could you have attacked them with success or not? | जर शत्रु लकडकोट बांधून आंत राहिला असता, तर त्यावर हल्ला करून तुमच्यानें जय मिळवला असता कीं काय? |
| 29 In what manner did you attack them, and did they give ground or not? | तुह्मीं त्यांवर कोणत्या रीतीनें हल्ला केला, आणि ते पाठीमागें हटले किंवा नाहीं? |
| 30 If they gave ground, why did you not advance upon them? | जर ते पाठीमागें हटले, तर तुह्मी त्यांच्या अंगावर कां सरसावलां नाहीं? |
| 31 What was there to cover the retreat of the enemy? | शत्रु पळाले त्या वेळेस त्यास कोणता आसरा होता? |
| 32 Did the Cavalry prove of any great service in this engagement and how many had you with you? | ह्या लढाईंत स्वार लोकांचा बराच उपयोग झाला होता काय, आणि त्यांपैकीं तुमच्या बरोबर किती होते? |
| 33 On what sort of ground did the engagement take place, and were you aware of the enemy being so near you? | जेथें लढाई झाली ती जागा कशी होती, आणि शत्रु इतका जवळ आला आहे हें तुम्हांस माहीत होतें काय? |
| 34 Did you take the enemy by surprise, or were they prepared to receive you? | तुम्ही शत्रूवर आकस्मात् जाऊन पडलां किंवा ते तुमचा हल्ला येणार म्हणून तयार होते? |
| 35 How did you get possession of the Fort, and did you find much difficulty in placing the scaling ladders? | किल्ला कसा तुमच्या हातीं आला? आणि किल्ल्यास शिड्या लावणें तुम्हांस फार कठीण पडलें काय? |
| 36 After getting possession of the Fort, did you find any money, elephants, horses, camels, bullocks &c.? | किल्ला हातीं आल्यावर त्यांत तुम्हांस कांहीं पैसा, हत्ती, घोडे, उंट, बैल वगैरे कांहीं मिळालें काय? |
| 37 Where were you yourself when the action commenced? | लढाई होऊं लागली तेव्हां तुम्ही कोठें होतां? |

| | |
|---|---|
| 38 Did the guns of the Horse Artillery do execution, and was it a large breach or not? | घोड्याच्या तोफखान्याच्या तोफांनीं पुष्कळ काम झालें काय? आणि मोटें भगदाड पाडलें कीं काय? |
| 39 How strong was the storming party, and did they find much resistence in forcing the breach? | हल्ला करणार ह्यांचे टोळींत किती लोक होते आणि आंत घुसतेवेळेस त्यांस शत्रूनें पुष्कळ प्रतिबंध केला काय? |
| 40 Did you suffer much injury from their Rockets, and did they fire many? | त्यांनीं बाण सोडल्यामुळें तुमचें फार नुकसान झालें काय? आणि त्यांनीं फार बाण सोडले काय? |
| 41 They fired a great many Rockets, but did not seem to understand directing them to any point. | त्यांनीं पुष्कळ बाण सोडले, परंतु त्यांस निशाण धरून सोडण्याचें ठाऊक नाहीं असें दिसलें. |
| 42 We were much annoyed by their matchlocks, which they continued firing without intermission during the whole siege. | त्यांनीं तोडयाच्या बंदुका सोडल्यामुळें आम्हांस फार उपद्रव झाला आणि जोंपर्यंत वेढा होता तोंपर्यंत ते एकसारखे सोडीतच होते. |
| 43 They seemed very much afraid of our Cavalry, and did not stand one charge. | ते आमच्या स्वार लोकांस फार भितात असें दिसलें आणि त्यांच्यानें आमच्या स्वारांच्या एकाही हल्ल्यापुढें टिकाव धरवेना. |
| 44 After taking the Fort, we discovered that they had thrown the dead bodies into the ditch which surrounded it; they left those who were wounded exposed to the sun without even water to drink. | किल्ला घेतल्यावर आह्मांस असें माहीत झालें कीं, त्यांनीं मुडदे किल्ल्याच्या भोंतालच्या खंदकांत टाकून दिले, आणि जे लोक जखमी झाले होते, त्यांसही पाणी प्यावयास दिल्यावांचून ते उन्हांत सोडून गेले. |
| 45 Most of the people escaped during the night, and took all their jewels with them. | बहुतेक लोक रातोरात आपलें जवाहीर घेऊन पळून गेले. |

| | |
|---|---|
| 46 When we entered the Fort, we found only a few poor people and the attendants of the place. | आह्मी किल्ल्यांत शिरलों तेव्हां थोडे कंगाल लोक व राजवाड्यांचे कांहीं सेवक इतके मात्र दृष्टीस पडले. |
| 47 Many of the run-aways were taken, those who were most afraid jumped into the river Taptee, some of whom swam to the other side, but most of them were carried away by the stream. | बहुतेक पळपटे लोक पकडले, आणि जे फार भित्रे (भ्याड) होते, त्यांनीं तापी नदींत उड्या टाकिल्या. त्यांतून कांहीं पोहून दुसरे तीरास लागले, पण बहुतकरून ते सर्व नदींत वाहून गेले. |
| 48 Our Cavalry were so anxious to pursue them that many followed them into the water, and stuck in the mud. | आमचे स्वार त्यांचा पाठलाग करण्याविषयीं इतके उतावळे होते कीं, त्यांच्यांतून पुष्कळ पाण्यांतून त्यांचे पाठीमागें जाऊन चिखलांत फसले. |
| 49 Some of the run-aways took shelter in a pagoda where the powder had been kept during the action, but the light train of Artillery having opened upon them, the powder caught fire by the bursting of a shell, and blew them up. | ज्या देवळांत लढाईचे वेळेस दारू ठेविली होती, त्यांत कित्येक पळपटे लोकांहीं जाऊन आश्रय धरिला, परंतु तोफखान्यांतील हलक्या तोफांचा भडिमार त्यांजवर लागल्यामुळें एक कुलपी गोळा फुटून दारूस आग लागली, व ते सर्व उडून गेले. |
| 50 By this accident, the enemy's force was completely destroyed, and the survivors fled through a field of sugar-cane. | अशी गोष्ट झाल्यानें शत्रूचें सैन्य अगदीं नाश पावलें, आणि जे लोक वचावले होते ते उंसाच्या शेतांतून पळून गेले. |
| 51 Owing to the thickness of the sugar-cane, the Cavalry could not follow them. | उसाच्या दाटीमुळें आमचे स्वारलोक त्यांचा पाठलाग करूं शकले नाहींत. |
| 52 Two flank companies having come up, took all those who had concealed themselves in the sugar-cane prisoners. | दोन फ्ल्यांक कंपन्या येऊन त्यांनीं जे लोक उंसाच्या शेतांत लपले होते त्या सर्वांस पकडलें. |

| | |
|---|---|
| 53 We lost in this engagement seven Officers, sixty Rank and File, one Drummer, seven Dooley-bearers, and nine Camp-followers. | या लढाईंत आमचे सात अंमलदार, साठ शिपाई, एक पडघमवाला, सात डोलीवाले आणि नऊ लश्करी माणसें मारलीं. |
| 54 Tell the Havildar to tell those soldiers, that if they again behave themselves in such a disorderly manner, they will be visited with the severest punishment. | हवालदारास सांग कीं, त्या शिपाई लोकांस जाऊन बोल कीं, जर फिरून तुह्मी असे गैर रीतीनें चालाल तर तुह्मांस मोठी शिक्षा मिळेल. |
| 55 The sepoys are coming to me every day, and are very importunate for their arrears of pay. | शिपाई लोक दररोज मजपाशीं येऊन चढलेल्या पगाराबद्दल मोठा तगादा करतात. |
| 56 The enemy wished much to take the Fort, but we prevented them. | शत्रूंची किल्ला घेण्याची फारच इच्छा होती, परंतु आह्मी घेऊं दिला नाहीं. |
| 57 We have sent some spies in search of the enemy, but they have brought us no news yet. | आह्मी शत्रूंचा शोध करण्यासाठीं कांहीं हेर पाठविले आहेत, परंतु त्यांनीं अद्याप कांहीं वर्तमान आणिलें नाहीं. |
| 58 The sepoys say that the Rupees they received for this month's pay are all counterfeit, and they want them changed. | शिपाई लोक ह्मणतात कीं, या महिन्याच्या पगाराचे रुपये आह्मांस मिळाले, ते सर्व खोटे आहेत, यासाठीं ते बदलून मागतात. |
| 59 The Subhedar stabbed his wife with a bayonet so badly that the entrails came out. | सुभेदारानें आपले बायकोच्या पोटांत संगीन इतकी भोसकली कीं, तिचीं आंतडीं बाहेर निघालीं. |
| 60 They wished to kill us by treachery, but we never gave them an opportunity. | त्यांनीं आह्मांस दगलबाजीनें (विश्वासघातानें) मारण्याचा बेत केला होता, परंतु आह्मी त्यांस तशी संधिच सांपडूं दिली नाहीं. |

61 Does a soldier remain on guard from sunrise till nine o'clock, or till twelve o'clock?

शिपाई पाहाऱ्यावर सूर्योदय झाल्यापासून नऊ तास वाजतपर्यंत किंवा बारा वाजतपर्यंत असतो?

62 After he had fired three rounds, I was ordered to search his pouch, and see how many balls and blank cartridges there were.

त्यानें तीन वेळां बंदूक सोडल्यावर मला हुकूम झाला कीं, त्याच्या तोसदानाचा झाडा घेऊन त्यांत गोळ्यांचें व गोळ्यांशिवाय तोटे बाकी किती आहेत ते पहावे.

63 The prisoner intentionally absented himself from the evening roll call, and when asked why, he replied, it was his intention to leave the service in a day or two.

कैदी बुद्ध्या संध्याकाळीं हजिरीचे वेळेस गैरहजर होता, आणि त्यास विचारलें तेव्हां त्यानें जबाब दिला कीं, एक दोन दिवसांत चाकरी सोडून देण्याचा माझा बेत आहे.

64 He swears that unless I give him a month's leave, he will desert from the service.

जर तुह्मी मला एक महिन्याची रजा न द्याल तर मी चाकरी सोडून पळून जाईन ही शपथ असें तो बोलता.

65 I directed the Sappers and Miners to cut away the bushes on the side of the road, so that our march might be practicable.

पुढें जाण्यास सोपें पडावें ह्मणून मी बेलदारांस रस्त्याचे बाजूवरील झाडें तोडून टाकण्याचा हुकूम केला.

66 I have faught as many battles as your father has.

जितक्या लढाया तुझ्या बापानें केल्या आहेत तितक्या मीही केल्या आहेत.

67 If I pass my examination with success, it is certain that I shall not obtain the appointment of Quarter-master for three years to come.

जरी माझी परीक्षा उतरली, तरी पुढें तीन वर्षेपर्यंत मला क्वार्टर मास्तरची जागा मिळणार नाहीं हें खचीत आहे.

68 He fired at the target, and almost hit it.

त्यानें निशाणावर बंदूक मारली, परंतु थोडी चुकली.

| | | |
|---|---|---|
| 69 | It is your turn to keep watch over this treasure for an hour, when I will relieve you. | खजीन्यावर एक तासपर्यंत तुझी पाहारा करण्याची पाळी आहे, त्यानंतर मी तुला सोडवीन. |
| 70 | Let the sepoys whose muskets are loaded come forward. | ज्या शिपाई लोकांच्या बंदुका भरल्या आहेत त्यांनीं पुढें यावें. |
| 71 | During the firing of the front rank, did you observe through whose negligence Haidarkhan's thumb was blown off? | पुढच्या रांगेच्या बंदुका सुटतेवेळेस कोणाचे गाफीलपणामुळें हैदर खानांचा अंगटा उडून गेला तें तुह्मी पाहिलें काय ? |
| 72 | What made you suppose that the prisoner was not able to stand sentry? | कैदी पाहारा करण्यास समर्थ नाहीं असें तुह्मीं कशावरून समजलां ? |
| 73 | He moved in a very unsteady manner like a drunken person. | तो दारू प्यालेल्या माणसाप्रमाणें झुकांत चालत होता. |
| 74 | Is it customary in your Regiment for any man to get leave from his guard during saluting hours? | सलामीचे वेळेस कोणी शिपायास आपले गादीवरून बाहेर जाण्यास रजा मिळण्याचा तुमच्या पलटणींत शिरस्ता आहे काय ? |
| 75 | The two armies entered Poona from exactly opposite directions. | त्या दोन फौजा समोरासमोरच्या दिशांकडून पुण्यांत शिरल्या. |
| 76 | Do you not know, that there is a General Order forbidding a non-Commissioned Officer commanding a guard to leave it at any time? | ज्या नन्कमिशनड् आफिसराचे ताब्यांत गार्द आहे तो त्यानें कधींही सोडून जाऊं नये अशी एक जनरल आर्दर आहे हें तुह्मांस माहीत नाहीं काय ? |
| 77 | The Jemadar received orders to defend the Fort to the last extremity. | जमातदारास हुकूम झाला कीं, बिलकूल उपाय राहिला नाहीं, असें होई तोंपर्यंत किल्ल्याचें रक्षण करावें. |
| 78 | If you had not insisted on walking on the rampart, you would not have tumbled into the ditch. | जर आग्रह धरून तुह्मी तटावर न फिरतां तर खंदकांत न पडतां. |

| | |
|---|---|
| 79 That man's musket could never have been broken in this way without the greatest carelessness. | त्यां मनुष्याची बंदूक मोठे गाफिलपणावांचून कधींही अशी मोडली नसती. |
| 80 The Court sentenced the Subhedar to be suspended from rank and pay for a period of three months. | सुभेदाराचा पगार व हुद्दा, तीन महिनेपर्यंत तहकूब ठेवावा, ह्याप्रमाणें कोर्टानें शिक्षा ठरविली. |
| 81 Whilst you were present, could the prisoner have struck the Subhedar without your seeing it? | तुम्ही तेथें असतां कैदीनें सुभेदारास मारावें, व तें तुमच्या दृष्टीस पडूं नये, अशी गोष्ट होईल काय? |
| 82 Have you ever been attacked by the enemy in front and flank at the same time? | तुमच्या फौजेचे समोर आणि बाजूवर एकदम शत्रूनें कधीं हल्ला केला होता काय ? |
| 83 Can you recollect the exact words which the prisoner made use of at the time he struck the Subhedar? | सुभेदारास मारतेवेळेस कैदी जे शब्द बोलला तेच तुम्हांस बराबर आठवतात काय ? |
| 84 Let all the sepoys who were absent from Parade this evening, have a week's drill, and afterwards bring them in full dress to my quarters. | आज संध्याकाळीं परेदीवर जे जे शिपाई हजर न होते त्यांस एक आठवडापर्यंत ड्रील द्या, नंतर फुल ड्रेस पेहरवून माझे घरीं घेऊन या. |
| 85 This man complains that he has been turned out of caste without any fault, merely from the spite of the Jemadar who is the head person in it. | हा माणूस अशी फिर्याद करितो कीं, कांहीं अपराध नसतांही फक्त जमातदाराच्या दाव्यामुळें मला जातींतून बाहेर टाकिलें आहे, कारण तो जातींत प्रमुख आहे. |
| 86 Obedience is the first duty of a soldier. | हुकूम मानणें हा शिपायाचा मुख्य धर्म होय. |
| 87 The musket fell out of his hand. | त्याच्या हातांतून बंदूक पडली. |
| 88 He must receive at least a hundred lashes. | निदान त्याला शंभर फटके मारिले पाहिजेत. |

| | |
|---|---|
| 89 He has received a wound in a dangerous place. | वर्मस्थानीं त्याला जखम लागली आहे. |
| 90 Where was your Regiment first raised? | तुमची पलटण पहिल्यानें कोठें भरली? |
| 91 In consequence of heavy rain, our march was stopped. | फार पर्जन्य पडल्यामुळें आमचे कूच बंद राहिलें. |
| 92 I saw him running towards the Cantonment. | मी त्यास छावणीकडे पळत जातांना पाहिलें. |
| 93 The enemy suffered a great loss. | शत्रूचें फार नुकसान झालें. |
| 94 The enemy having crossed the river made their escape. | शत्रूनें नदीपार उतरून पळून जाऊन आपला बचाव केला. |
| 95 The enemy depopulated the country. | शत्रूनें सर्व देश उजाड केला. |
| 96 Were any particular instructions given to the Picquet by the Naik commanding it? | ज्या नायकाच्या स्वाधीन पिकीत होती त्यानें पिकितीवरचे लोकांस कांहीं विशेष हुकूम सांगितले होते काय? |
| 97 What kind of a room is the liquor kept in, and do you think any quantity of it could be stolen without the knowledge of the sentry? | ज्या ठिकाणीं दारू ठेवतात, तें ठिकाण कसें आहे आणि पाहारेकऱ्यास न समजतां त्यांतून कांहीं चोरीस जाईल, असें तुम्हांस वाटतें काय? |
| 98 Is there any order in the Regiment concerning borrowing or lending money? | पैशाची देवघेव करण्याविषयीं पलटणींत कांहीं हुकूम आहे काय? |
| 99 Did the prisoner at any time seize the orderly by the throat, and make use of threatening language? | तो कैदी आर्दलींचा गळा धरून धमकीचें बोलणें बोलला असें कधीं झालें? |
| 100 Did you not say any thing to the prisoner previous to his beating you? | कैदीनें तुम्हांस मारल्यापूर्वीं तुम्ही त्याला कांहीं बोलला नव्हतां काय? |
| 101 You should have confined him as soon as you became aware of this circumstance. | ही गोष्ट समजतांच लागलेंच तुम्ही त्यास कैद करावयाचें होतें. |

102 If you had asked permission to be absent from Parade, it would have been given you, but as you would not take the trouble of doing so, you must abide by the consequence.

तुह्मी परेदीवरून गैरहजर राहण्याची परवानगी मागितली असती तर ती तुह्मांस मिळाली असती, परंतु तुह्मी असें करण्याचा आळस केला ह्मणून, त्याचें फळ तुह्मांस भोगलें पाहिजे.

103 I confined him for falsely stating in the Bazaar that I had spread reports prejudicial to his character.

मी त्याची नालस्ती करीत फिरलों असें तो खोटें बाजारांत बोलला, ह्मणून मी त्यास कैद केलें.

104 Warn the usual party to proceed to-night with the Tabut, and give a strict order to the Commanding Officer to allow no person with sticks or bludgeons to accompany the procession.

नेहेमीप्रमाणें एके टोळीस ताबुताबरोबर आज रात्रीं जाण्याविषयीं वर्दी द्या; आणि मुख्य आफिसरास चांगली ताकीद द्या कीं, ताबुताच्या मिरवणुकेबरोबर हातांत काटी अगर सोटा घेऊन कोणास येऊं देऊं नका.

105 I confined that man for falsely accusing me of having reported in the lines that I had seen him eating with a Purwary.

मी त्याला परवाऱ्याबरोबर जेवतांना पाहिलें, असें मी लैनींत सांगितलें, हें जें त्यानें मजवर बालंट घेतलें त्यासाटीं मी त्याला कैद केलें.

106 Fortunately, the enemy was as dilatory in making the attack as the garrison was in preparing for defence.

दैवयोगानें असें झालें कीं, गडकरी ह्यांस किल्ल्याचें रक्षण करण्यास तयारीला जितका विलंब लागला, तितकाच शत्रूनें हल्ला करण्यास लाविला.

107 Had the French stormed the place on their arrival it would have been taken.

फ्रेंच लोकांनीं त्या जाग्यावर पोंचतांच हल्ला केला असता, तर ती त्यांचे हातांत गेली असती.

108 When the enemy beheld a very considerable army they surrendered the Fort.

जेव्हां शत्रूनें मोठी फौज येत आहे असें पाहिलें, तेव्हां त्यांनीं किल्ला सोडून दिला.

| | |
|---|---|
| 109 The British forces were greatly inferior to those of the Peshwa in number. | इंग्रजांची फौज पेशव्यांच पेक्षां फार थोडी होती. |
| 110 So long as the conflagration cast a light, not a movement was made by the enemy to interrupt the operations of the garrison. | जोंपर्यंत आगीच्या डोंबाचा प्रकाश पडला होता तोंपर्यंत गडकरी लोकांच्या कामास अडथळा करण्याविषयीं शत्रूनीं कांहींच हालचाल केली नाहीं. |
| 111 Many Officers displayed the greatest gallantry and personal exertion. | पुष्कळ सरदार लोकांनीं स्वतां फार शौर्य दाखविलें आणि अंगीं श्रम घेतले. |
| 112 The General was shot in the breast, and he plunged into the sea preferring death to captivity. | जनरलाचे छातीस गोळी लागली तेव्हां, शत्रूचे हातांत पडून कैद व्हावें त्यापेक्षां मरण चांगलें, असें समजून त्यानें समुद्रांत उडी टाकिली. |
| 113 It is impracticable to take a place which has been declared too strong to be taken. | जी जागा फार बिकट ह्मणून सर्व लोक बोलतात, ती घेणें अशक्य आहे. |
| 114 Every individual did his duty with energy. | प्रत्येकानें आपलें काम हिम्मतीनें केलें. |
| 115 The loss of the Peshwa was great in proportion to the number engaged. | फौजेची संख्या पाहिली असतां, पेशव्यांचीं माणसें फारच मारलीं गेलीं. |
| 116 If the villagers had not barricaded the village, the enemy's army would have plundered them. | गांवकरी लोकांनीं आपल्या गांवची नोकंवदी (शत्रूची वाट बंद करण्यासाठीं मध्यें लांकडें वगैरे ह्यांचा कोट घालतात तो) केली नसती तर शत्रूच्या फौजेनें त्यास लुटलें असतें. |
| 117 I was standing within musket shot. | मी गोळीच्या टप्यांत उभा होतों. |
| 118 The enemy attacked us on every side. | शत्रूनें आह्मांवर चहूंकडून हल्ला केला. |

| | |
|---|---|
| 119 They were forced to give way. | त्यांस मागें हटणें प्राप्त पडलें. |
| 120 Before reaching the place of destination, we must go through a narrow defile. | ज्या जागयाचा मनांत उद्देश धरिला आहे, त्या ठिकाणीं पोंहचण्यापूर्वीं आपणास एके अडचणीचे खिंडींतून जावें लागेल. |
| 121 How many years were you in the Company's service, and where were you last employed? | किती वर्षेंपर्यंत तुह्मी कंपनी सरकारची चाकरी केली आणि निघालां तेंव्हां कोठें होतां ? |
| 122 Fifteen years, and I have been in all the battles and sieges that have been fought during the last ten years. | पंधरा वर्षेंपर्यंत चाकरी केली, आणि शेवटच्या दहा वर्षांत जितक्या लढाया व घेरे झाले त्या सर्वांत मी हजर होतों. |
| 123 The enemy having dug the mine, blew up the tower. | शत्रूनें सुरंग लावून बुरूज उडवून दिला. |
| 124 Do you object to any member of the Court? | या कोर्टांतील कोणत्याही असामीविषयीं तुह्मी तकरार आहे काय ? |
| 125 Yes, I object to Lieutenant so and so. | होय, फलाण्या साहेबाविषयीं माझी तकरार आहे. |
| 126 Make a circuit with your party, and attack the enemy in their rear. | तुह्मी आपल्या टोळीच्या लोकांसहित फेरा करून जाऊन, शत्रूचे फौजेचे पिछाडीवर हल्ला करा. |
| 127 Take post with your detachment on the rising ground and should you see any troops approaching, send notice quickly to the main body. | तुह्मी आपली टोळी घेऊन टेंकडीवर टाणें द्या, आणि जर कांहीं फौज जवळ येत आहे असें पाहिलें, तर तत्क्षणीं लष्करांत खबर पाठवा. |
| 128 If you had obeyed the orders that were given, you would not have been defeated. | जे हुकूम तुह्मांस मिळाले होते, त्यांप्रमाणें तुह्मी चालला असतां तर, तुमचा पराजय झाला नसता. |

| | | |
|---|---|---|
| 129 | Were you present at the collection of the unexpended cartridges after Parade on the morning of the fourth instant? | या महिन्याचे ४ थे तारखेस सकाळीं परेद झाल्यावर शिलक राहिलेले तोटे जमा केले, त्यावेळेस तुह्मी हजर होतां काय ? |
| 130 | Did you hear the Naik at 12 o'clock order me to go alone to relieve the sentry in the Custom House gateway? | तूं एकटा जाऊन मांडवीचे दरवाजावरचे पाहरेकऱ्याची बदली कर, असा नायकानें बारा वाजतांना मला हुकूम देतांना तुह्मी ऐकिलें काय ? |
| 131 | If you had conceived that the sentry had no right to stop you, you might have complained to the Havildar of the Guard, but you had no business to make use of bad language to him. | संत्र्यास मला अटकाव करण्याचा अधिकार नाहीं असें जर तुह्मी समजलां होतां, तर तुह्मी जाऊन गार्दचे हवालदारापाशीं फिर्याद करावयाची होती, परंतु त्यास शिव्या देण्याचें तुह्मांस काम नव्हतें. |
| 132 | It is calculated that only one musket shot in one hundred takes effect. | लढाईंत शंभर गोळ्यांतून एक गोळी मात्र लागते असा सुमार केला आहे. |
| 133 | In our Artillery practice, the proper proportion of powder is accurately adjusted to the weight of the ball. | आमचे तोफखान्याचे परेदीवर गोळीच्या वजनाप्रमाणें जितकी दारू पाहिजे तितकी बेतानें देतात. |
| 134 | The soldier should be directed to cover his object before he fires his musket. | शिपायास बंदूक सोडण्यापूर्वीं बरोबर नेम धरण्याविषयीं सांगावें. |
| 135 | At one hundred yard's distance, a musket carefully loaded and skillfully handled, will do more execution than one hundred muskets otherwise discharged. | शंभर यार्डांचे अंतरावर एक बंदूक सावधगिरीनें भरून हिकमतीनें धरली, तर तिजकडून दुसऱ्या रीतीनें भरून शंभर बंदुका सोडल्यापेक्षां अधिक काम होईल. |

136 The sepoys formed square with fixed bayonets, and received the charge gallantly.

शिपाई लोकांनीं कोट बांधून संगीन चढवून मोठ्या शौर्यानें घाला संभाळिला.

137 If the sentry had not prevented the enemy, we should certainly have been slain.

जर संत्र्यानें शत्रूस अटकाव केला नसता, तर निःसंशय आपण सर्व मारले गेलों असतों.

138 He made a splendid retreat before an enemy of superior force.

शत्रूच्या मोठे सैन्यापुढून, तो मोठे चतुराईनें पाठीमागें हटला.

139 At what distance can you do execution with this gun?

ही तोफ किती अंतरावरून लागू करितां येईल.

140 As the detachment was taking forage for the European Regiment at Deesa, it was attacked by the Bheels.

ती शिपायांची टोळी डिशांतील गोरे पलटणीसाठीं दाणा वैरण नेत असतां, तिजवर भिल्लांनीं छापा घातला.

141 In the midst of the battle the magazine took fire.

भर लढाईत दारूखान्याला आग लागली.

142 Our Regiment was relieved by the 15th.

पंधराव्या पलटणीनें आमचे पलटणीची बदली केली.

143 He deemed it advisable to blockade the road which led to the Cantonment of the enemy.

शत्रूचे छावणीवर जाण्याचा मार्ग बंद करावा हें योग्य आहे, असें त्यास वाटलें.

144 He thought it expedient to raise a battery fronting the camp of the enemy.

शत्रूचे गोटासमोर मोरचे बांधणें योग्य आहे असें त्यास वाटलें.

145 When I arrived at the Quarter Guard, I saw the prisoner who was then a sentry stooping at the end of his post with his musket resting against the wall.

जेव्हां मी क्वारटर गार्दावर जाऊन पोहचलों, तेव्हां कैदी जो त्यावेळीं पहाऱ्यावर होता, त्याला मी पहाऱ्याचे शेवटास ओणवलेलें पाहिलें व त्याची बंदूक भिंतीशीं टेकली होती.

| | | |
|---|---|---|
| 146 | I was formerly in the 19th Regiment but about a week ago I was transferred to the 20th. | मी पूर्वी एकुणिसावे पलटणींत होतों, परंतु एक आठवडा झाला माझी बदली विसावींत झाली. |
| 147 | I had three ball cartridges in one compartment of my cartouch box and two blank in the other. | माझे तोसदानाचे एके खणांत गोळ्यांसहित तीन काडतुसें आणि दुसऱ्यांत गोळ्यांशिवाय दोन काडतुसें होतीं. |
| 148 | What length of time elapsed from your first seeing the prisoner sitting or lying down, and the time of his rising and challenging? | प्रथम तुह्मीं कैदी बसलेला अथवा निजलेला पाहिला, त्यानंतर किती वेळानें त्यानें उठून हटकलें ? |
| 149 | We were nearly losing the Fort. | थोडें चुकलें नाहीं तर आमचे हातांतून किल्ला गेलाच असता. |
| 150 | He tried to evade being seen by the sentry. | त्यानें पहारेकऱ्याची नजर चुकविण्याचा यत्न केला. |
| 151 | The seventh Company fired six rounds at to-day's ball practice. | आजचे गोळीबाराचे परेदीवर सातव्या कंपनीनें सहा गोळीवार मारिले. |
| 152 | If we had surprised the enemy, we should undoubtedly have gained the victory. | जर आह्मी एकाएकीं जाऊन शत्रूवर चढाव करितों तर निःसंशय आह्मांस जय मिळाला असता. |
| 153 | When we took possession of the town, we found all the hospitals filled with the wounded, so that there was not a vacant place to put our own in. | जेव्हां तें गांव आमचे हातीं आलें तेव्हां सर्व हास्पितळें जखमी लोकांनीं इतकीं भरून गेलीं होतीं कीं, आमचे जखमी झालेले लोकांस तेथें ठेवण्यास कांहीं रिकामी जागा नव्हती. |
| 154 | The two armies fought for two days with very little intermission, and both claimed the victory. | दोन्ही फौजा दोन दिवसपर्यंत फार खळ न पडतां लढल्या, आणि उभयतां आमचा जय झाला असें सांगूं लागल्या. |

| | | |
|---|---|---|
| 155 | The scene of war ought always to be carried into the enemy's country. | लढाई करावयाची ती हमेषा शत्रूच्या देशांत करावी. |
| 156 | If you had neglected shutting up the pass in the mountains, the enemy would undoubtedly have taken the town. | जर तुह्मी घाट बंद करण्याचे कामांत हयगय केली असती, तर शत्रूनें गांव खचीत घेतलें असतें. |
| 157 | When you saw the General's wound, did it appear mortal? | जेव्हां तुह्मी जनरल साहेबांचा वार पाहिला तेव्हां तो प्राण जाण्यासारिखा दिसला होता काय? |
| 158 | The Havildar and men of the Light Company deserve the greatest praise for defending the sallyport in such gallant style. | लैत कंपनीचा हवालदार व शिपाई लोक ह्यांनीं मोठे शौर्यानें किल्ल्याचा बोगदा बचाविला यासाठीं त्यांची फारच तारीफ करणें योग्य आहे. |
| 159 | In going up the stairs of the Rampart, the sepoy broke the butt of his musket. | शिपाई किल्ल्याच्या तटाचे पायरीवर चढला त्यावेळीं त्यानें बंदुकीचा दस्ता मोडून टाकिला. |
| 160 | Raise a battery of four Guns upon that hillock opposite the left flank bastion of the town, and let me know when it is completed. | जी टेकडी किल्ल्याचे डावे बाजूचे बुरजासमोर आहे तिजवर चार तोफांचा एक मोरचा बांध आणि पुरा झाला ह्मणजे मला खबर दे. |
| 161 | The Havildar of the pioneers says that he fired the train in the mine, but owing to last night's rain, the powder had become damp and did not explode. | बेलदार लोकांचा हवालदार सांगतो कीं, आह्मी सुरंगाचे रांगेला बत्ती दिली; परंतु काल रात्रीस पाऊस पडल्यामुळें दारू भिजून गेली ह्मणून उडाली नाहीं. |
| 162 | The sepoys of the Marine Battalion are governed by the same laws and are liable to the same punishments as those of the other Native Regiments of the Bombay Presidency. | मुंबई इलाख्याचे इतर काळेपलटणीस जे कायदे व ज्या शिक्षा लागू आहेत, त्याच मरीनबटालियन यांस लागू आहेत. |

| | | |
|---|---|---|
| 163 | I read in the "Courier" of yesterday that the war in China is brought an end to. | मी कालचे कुरियरपत्रांत वाचलें कीं, चीन देशांत जी लढाई चाल-ली होती तिचा शेवट झाला. |
| 164 | Do you know the reason of its being settled ? | तिचा शेवट झाल्याचें कारण तुह्मांस ठाऊक आहे काय ? |
| 165 | I heard that it was settled on account of the death of Lord Napier. | मी ऐकिलें कीं, लार्ड नेपियर साहे-बांचे मरणामुळें लढाईचा शेवट झाला. |
| 166 | Did you see the prisoner dash down his musket on the Parade ground ? | परेडीचे जाग्यावर कैदीस आपली बंदूक आपटतांना तुह्मी पाहिलें काय ? |
| 167 | Tell the soldiers to get their kit ready because I will inspect them. | शिपाई लोकांस सांगा कीं, मी पहा-वयास येणार आहें ह्मणून आपलें सामान तयार करून ठेवा. |
| 168 | The enemy surrounded us but we escaped under cover of the fortification. | शत्रूनीं आह्मांस वेढून टाकिलें, परंतु आह्मी किल्ल्याचे आश्रयानें बचा-वलों. |
| 169 | Had the Officer given proper orders to those sepoys, they would not have allowed the enemy to capture the Fort. | अंमलदारानें त्या शिपाई लोकांस ब-रावर हुकूम दिला असता तर त्यां-नीं शत्रूचे हातांत किल्ला जाऊं दि-ला नसता. |
| 170 | The intrenchment that we dug round the walls of the citadel was filled up with the stones thrown by the enemy from above. | आह्मीं किल्ल्याच्या सभोंवता खंदक खंटला होता, शत्रूनीं तो वरून धों-डे टाकल्यामुळें भरून गेला. |
| 171 | If you saw an army advancing obliquely, what do you think would be the best plan to attack it ? | फौज तिरकस पुढें येतां जर तुमचे-दृष्टीस पडली तर तिजवर हल्ला-करण्याची युक्ति तुह्मांला बरी को-णती दिसेल. |

| | |
|---|---|
| 172 When I was going the Visiting Rounds, I saw his musket on the ground and he himself leaning against a pillar fast asleep. | जेव्हां मी विजिटिंग रोंदावर जात होतों तेव्हां त्याची बंदूक भुईवर पडलेली पाहिली आणि तो स्वतां खांबास टेकून गाढ झोपीं गेला होता. |
| 173 Warn the Subhedar who goes with the party, that if the enemy does not appear by 10 P. M., he must return, taking care to make no noise in leaving his ground lest he should be discovered to be lying in wait; if he meet any suspicious looking people on his return let him arrest them and bring them before me. | सुभेदार जो तुकडीबरावर जात आहे त्यास ताकीद द्या कीं, जर शत्रु रात्रीं दहा वाजतपर्यंत दृष्टीस पडला नाहीं तर तूं परत ये, पण येतेवेळेस संभाळ, कांहीं गोंगाट करूं नको, नाहीं तर शत्रूस तुझें दडणें उमगेल आणि पाठीमागें येत असतां जर कोणी वहीम येण्यासारखीं मनुष्यें आढळतील, तर त्यांस पकडून मजजवळ आण. |
| 174 Did you see that man firing his musket at the Serjeant? | तुह्मी त्या मनुष्याला सारजंतावर बंदूक सोडतांना पाहिलें काय ? |
| 175 The wall was too high to be escaladed but might have been easily battered down. | ती भिंत फार, उंच, ह्यामुळें शिडी लावून वर चढणें अशक्य होतें, परंतु तोफा लावून पाडणें हें सोपें होतें. |
| 176 There was a conspiracy amongst the sepoys, which was however soon discovered. | शिपाई लोकांनीं कांहीं संगनमत केलें होतें, परंतु तें लौकरच उघडकीस आलें. |
| 177 What is your opinion, should a soldier at all times obey the orders of his superior, or is he at any time whatever to be permitted to exercise his own judgment upon the propriety of the order? | शिपायानें नेहेमीं आपल्या वरच्या अधिकाऱ्याचा हुकूम मानावा किंवा एखादे वेळेस तो हुकूम योग्य आहे किंवा नाहीं ह्याविषयीं आपली बुद्धि खर्चण्याची त्यास परवानगी आहे ह्याविषयीं तुमचें मत काय आहे ? |

| | |
|---|---|
| 178 If my gun had not flashed in the pan, I should undoubtedly have hit the mark. | जर माझी बंदूक रंजकी प्याली नसती तर मी खचीत निशाण मारिलें असतें. |
| 179 If you had not been standing within the range of that cannon shot, you would not have been so severely wounded; I hope this will be a warning to you. | जर तुह्मी त्या तोफेच्या टप्प्यांत उभे राहिलां नसतां तर तुह्मांस अशा रीतीनें कठीण घाय झाला नसता, आतां तुह्मी ह्या गोष्टीवरून सावध राहाल अशी माझी आशा आहे. |
| 180 He was going in the opposite direction to the enemy. | तो शत्रूच्या उलट्या दिशेनें जात होता. |
| 181 In consequence of the carelessness of Abdool Curreem's rear rankman, his thumb was blown off. | अबदूलकरीमाचे पिछाडीच्या रांगेचे शिपायाचे गफलतीमुळें त्याचा अंगठा उडून गेला. |
| 182 He is very young to be Major. | मेजरच्या पदवीला फार तो अल्पवयस्क आहे. |
| 183 Half cock your musket. | तुझे बंदुकीचा घोडा अर्धा चढीव. |
| 184 As a Subhedar of the Regiment, what is your opinion respecting the feelings of the native officers concerning the duty they have to perform in the Regiment? | तुह्मी पलटणींत सुभेदार आहां त्यापक्षीं पलटणींतील नेटिव अंमलदारास जें काम करावें लागतें त्याविषयीं त्यास कसें काय वाटतें ह्याबाबद तुमचें काय मत आहे? |
| 185 Before you pull the trigger, you must cock the piece. | चाप दावण्यापूर्वीं बंदुकीचा घोडा चढविला पाहिजे. |
| 186 At midnight the enemy stormed the Fort. | मध्यरात्रीस शत्रूनें किल्ल्यावर छापा घातला. |
| 187 I am quite sure his musket was not loaded when he pursued the enemy. | माझी पक्की खातरी आहे कीं, ज्या वेळीं तो शत्रूचे पाटीस लागला त्या वेळेस त्याची बंदूक भरलेली नव्हती. |

| | |
|---|---|
| 188 After the object of the expedition was accomplished, the various detachments returned to their respective encampments, and divided the booty amongst themselves. | मोहीम करण्याचा उद्देश सिद्धीस गेल्यावर सर्व टोळ्या आपापले छावणींत परत आल्या, आणि जी लूट मिळाली होती ती त्यांनीं वांटून घेतली. |
| 189 The thickness of the wood favoured the concealment of the enemy, and without loss to themselves they killed many of our men. | जंगलाच्या दाटीमुळें शत्रूंस दडण्यास मोटा आश्रय मिळाला, आणि स्वतांची नुकसानी कांहींच न होतांना त्यांनीं आमचे पुष्कळ लोक मारून टाकिले. |
| 190 Though he was previously informed of the consequences, he continued his march, but at last fell a victim to his obstinacy. | जरी त्याला पूर्वींच सूचना झाली होती कीं, ह्या गोष्टीचा परिणाम असा होईल, तरी तो पुढें तसाच चालला, व शेवटीं हट्टामुळें त्याचा नाश झाला. |
| 191 The sepoys were so fatigued with the late wearying marches through a sandy country, that they would have made an attack without any effect when we reached the village. | वाळवंटांतून कूच केल्यामुळें शिपाई लोक इतके थकून गेले होते कीं, आह्मी गांवाजवळ पोहोंचलों तेव्हां त्यांनीं हल्ला केला असता तर त्यापासून कांहीं उपयोग झाला नसता. |
| 192 My sword from remaining in the scabbard so long, has become rusty. | माझी तरवार फार दिवस म्यानांत राहिली ह्मणून जंगून गेली. |
| 193 He ordered the English to advance and attack that part of the line which still maintained its position. | त्यानें गोरे शिपायांस हुकूम केला कीं, पुढें चालून त्या रांगेतले जे लोक अजूनपर्यंत जाग्यावर थांबून राहिले आहेत त्यांवर हल्ला करावा. |

| | |
|---|---|
| 194 The man was tried for disobedience of orders, and found guilty; but the Court taking into consideration his former good conduct have recommended him not to be punished but severely reprimanded. | हुकूम तोडल्याचे अन्यायावरून त्या मनुष्याची चौकशी होऊन तो गुन्हेगार ठरला; परंतु कोर्टानें त्याचे पूर्वींच्या चांगले वर्त्तणुकेवर नजर देऊन त्यास शिक्षा करूं नये, परंतु चांगली धमकी मात्र द्यावी अशी विनंती केली. |
| 195 The Commanding Officer bids me say that this man's conduct was worthy of the severest punishment, but nevertheless, in hopes of his improvement, the Court have pardoned him. | कमांडिंग आफिसरानें मला सांगण्यास आज्ञा केली आहे कीं, ह्या मनुष्याची वर्त्तणूक कडक शिक्षा देण्यास योग्य आहे, तथापि कोर्टानें त्याचे सुधारण्याच्या आशेनें त्यास माफी केली. |
| 196 On being old by this Commanding Officer that he was to have double drill for three days, what did he say? | त्या मनुष्याचे कमांडिंग आफिसरानें त्यास सांगितलें कीं, तुला तीन दिवसपर्यंत डबल ड्रिल मिळेल तेव्हां तो काय बोलला ? |
| 197 When you ordered him to go on his tour of sentry, did he draw his weapon and refuse to go? | जेव्हां तुह्मी त्यास पहाऱ्यावर जाण्याची तुझी पाळी आहे ह्मणून तूं जा असा हुकूम दिला, तेव्हां त्यानें हत्यार मेणांतून काढून जाण्याचें नाहीं ह्मटलें काय ? |
| 198 When you went to parade, what Subhedar was present? | तुह्मी परेडीवर गेलां तेव्हां कोणता सुभेदार हजर होता ? |
| 199 Were you in the lines on the night of the disturbance? | ज्या रात्रीस गडबड झाली त्या रात्रीस तुह्मी लैनींत होतां काय ? |
| 200 When you ordered the prisoner to return to his lines and he refused to go, what did you do then? | जेव्हां तुह्मी त्या कैदीला लैनींत परत जाण्याचा हुकूम केला आणि त्यानें जावयाचें नाहीं ह्मटलें तेव्हां तुह्मी काय केलें ?. |

| | |
|---|---|
| 201 The stocks of two muskets are broken; the ramrods of three are lost; the lock of one is quite useless; the cocks of two have become loose; the barrel of one is crooked; the screws of one are lost; and the sight of another has been broken off. | दोन बंदुकांचे दस्ते मोडून गेले आहेत; तिहींचे गज हरवले आहेत; एकीचा चाप निरुपयोगी झाला आहे; दोहींचे घोडे ढिले झाले आहेत; एकीची नळी वांकडी झाली आहे; एकीचे मळसूत्र हरवले आहे; आणि दुसरीची माशी तुटून गेली आहे. |

# JUDICIAL PHRASES.

| | |
|---|---|
| 1 I believe him to be a notorious impostor and swindler. | तो प्रसिद्ध ठक आणि उपटचा आहे अशी माझी खातरी आहे. |
| 2 How do you know that this is the man who struck you? | ज्यानें तुह्मांस मारिलें तो हाच मनुष्य आहे, हें तुह्मी कशावरून जाणतां? |
| 3 I told him what I thought right, but he did not listen to me. | जें मला बराबर वाटलें तें मी त्यास सांगितलें, परंतु त्यानें माझें ऐकिलें नाहीं. |
| 4 Could you assign any reason for it at that time? | त्या वेळेस ह्या गोष्टीचें कांहीं कारण सांगावयाजोगें तुह्मांस सुचलें होतें काय? |
| 5 He told me many things, but I was quite mute. | त्यानें मला पुष्कळ गोष्टी सांगितल्या, परंतु मी अगदीं मौन धरिलें. |
| 6 I cannot speak positively as to the place of my nativity, nor who were my parents. | माझा जन्म कोठला आणि माझे आईबाप कोण हें माझ्यानें कांहीं खचित सांगवत नाहीं. |
| 7 Did you keep your eyes fixed upon the spot during the whole of the transaction? | जोंपर्यंत तें सर्व काम होत होतें. तोंपर्यंत तुमची नजर त्या जाग्यावर होती काय? |
| 8 Had not other persons been present, it is probable that he would have denied having said so. | जर दुसरे लोक हजर नसते, तर मी हें बोललों नाहीं असें तो बहुधा सांगता. |
| 9 Was it before or after your leaving the house, that he said he would commit the murder? | मी खून करीन असें तो बोलला, हें तुह्मी बाहेर गेल्यापूर्वीं किंवा नंतर बोलला? |

| | |
|---|---|
| 10 Should you have supposed it possible, that a man of whom you entertained so high an opinion, could be guilty of such an act? | ज्याचा तुह्मी इतका बोज राखिला त्याचे हातून असें काम होईल अशी कल्पना तुमचे मनांत आली असती काय? |
| 11 Could any person, besides yourself, have seen him striking his wife? | तुमच्या खेरीज आणखी कोणी त्याला आपले बायकोस मारतांना पाहिल्याचा संभव आहे काय? |
| 12 Have you any witness of what happened at that time? | त्यावेळेस जी गोष्ट घडली त्या गोष्टीविषयीं तुमचा कोणी साक्षीदार आहे काय? |
| 13 I will enquire into your case, and if I find it true, you shall have redress. | मी तुमच्या खटल्याची चौकशी करीन, आणि तुह्मी बोलतां हें मला खरें वाटलें तर तुह्मांस दाद मिळेल. |
| 14 Was it possible for any man to have been in the house at the time of the robbery without hearing the noise the thieves made in breaking open the door? | दरवडा पडला त्यावेळेस त्या चोरांनीं दार फोडतांना जो आवाज केला तो ऐकिल्यावांचून त्या घरीं कोणी राहिलें असें संभवेल काय? |
| 15 I should say decidedly not; as I, in a house at some distance, was awakened out of a sound sleep by the noise, it is not likely that any one in that very house could have avoided hearing it. | मी निःसंशय सांगतों कीं, असें झालें नसेल; कारण मी त्या घरापासून कांहीं अंतरावर एका घरांत गाढ (झोपीं गेलों असतां) झोंपेतून त्या आवाजानें जागा झालों. मग जो माणूस त्याच घरांत होता तो तो ऐकिल्यावांचून कसा राहील? |
| 16 If he made a noise at the door whilst you were in the room, how could it be that you did not hear it? | तुह्मी खोलींत असतां त्यानें दरवाजाजवळ आवाज केला असल्यास तो तुह्मी ऐकिला नाहीं असें कसें होईल? |

| | |
|---|---|
| 17 I knew by the creaking of his shoes that he was coming upstairs. | त्याचा जोडा करकर वाजल्यावरून मी समजलों कीं, तो माडीवर येत आहे. |
| 18 He offered him a bribe to give his evidence in favour of the defendant. | प्रतिवादीचे तर्फेनें तुह्मी बोलाल तर तुह्मांस कांहीं देऊं असें तो त्यास बोलला. |
| 19 From the circumstances we have just heard, I am of opinion that a strong degree of suspicion attaches to this man; so he must be committed to take his trial at the next sessions. | आतां आपण ही सर्व हकीकत ऐकिली तीवरून माझें असें मत आहे कीं, ह्या मनुष्यावर मोटा वहीम येतो ह्मणून येते सेशनांत चौकशी होण्याकरितां त्याला कैदेंत ठेविलें पाहिजे. |
| 20 When a man is brought upon a charge of murder, is he imprisoned or bailed? | माजिस्त्रेटापुढें कोणावर खून केल्याची फिर्याद झाली असतां त्याला कैदेंत ठेवितात किंवा त्याचा जामीन घेऊन सोडतात? |
| 21 In the Court it is necessary that the witnesses be sworn, but should one refuse, what is done? | कोर्टांत साक्षीदारांस शपथ दिली पाहिजे, परंतु जर कोणी साक्षीदार शपथ घेण्यास ना ह्मणेल तर काय करितात? |
| 22 How is this matter to be settled by the tenets of your religion? | तुमच्या धर्मशास्त्राप्रमाणें ह्या खटल्याचा निर्णय कसा होईल? |
| 23 The woman was divorced by a judgment of the Court. | कोर्टाच्या फैसल्याचावरून त्या स्त्रीस सोडचिटी मिळाली. |
| 24 When you saw the corpse on the bank of the river, was there any cord round its neck? | तुह्मीं तें प्रेत नदीच्या किनाऱ्यावर पाहिलें, तेंवेळेस त्याच्या गळ्याभोंवतीं दोरी होती काय? |
| 25 Is it possible he could have come without your seeing him? | तो तेथें आला असतां तुह्मी त्यास पाहिलें नाहीं, असें संभवतें काय? |

26 If he had come, might you have seen him?

जर तो आला असता तर त्यास पाहण्याला तुह्मांस कांहीं अडचण होती काय ?

27 Do you know if there are any vacancies in the judicial line?

जुडिशाल खात्यांत कांहीं जागा रिकाम्या आहेत किंवा नाहींत, हें तुह्मांस ठाऊक आहे काय?

28 You might have been put in prison for interfering with those Police peons on duty; but as you have escaped this time, I hope you will take warning in future.

पोलिसाचे शिपाई लोक अम्मले कामावर असतां तुह्मीं त्यांस हरकत केल्यामुळें कैदेंत जाण्याची पाळी तुह्मांवर आली होती; परंतु ह्या वेळेस बचावलां गेलां. ह्मणून ह्यापुढें तुह्मी संभाळून चालाल अशी माझी आशा आहे.

29 How can you swear so positively to the identity of the prisoner, as you have admitted that at the time you saw him it was very dark?

तुह्मी तो मनुष्य पाहिला तेव्हां फार अंधार होता असें तुमच्या बोलण्यांत आलें, तर तोच हा कैदी अशी शपथ घेऊन तुह्मी खास बोलतां हें कसें?

30 It is true that it was very dark at that time; but the prisoner you will observe has a scar on his forehead, which I saw distinctly, and by which I now recognise him.

त्यावेळेस फार अंधार होता खरा, परंतु तुह्मी पहाल तर तुह्मांस दिसेल कीं, कैदीचे कपाळावर डाग आहे तो मी ते वेळेस स्पष्ट पाहिला होता,आणि त्या डागावरून मी आतां त्यास ओळखतों.

31 Let a peon go with him to the village and look for the cow.

गाईचा शोध करण्यासाठीं एक चपराशी त्याच्या बराबर त्या गांवांत पाठवा.

32 This man has a petition that he may be permitted to enclose a piece of land, about half a Beegha, near the town.

गांवांजवळ अर्ध विघा जमीन आहे, तीस आवार घालण्यास हुकूम मिळावा अशी ह्या मनुष्याची अर्जी आहे.

| | |
|---|---|
| 33 That land is within camp limits, I have nothing to do with it. | ती जमीन छावणीचें हद्दींत आहे; तिजवर माझा कांहीं अक्त्यार नाहीं. |
| 34 To whom shall I apply? | मी कोणापाशीं जाऊन अर्ज करूं? |
| 35 What has this man been doing? | ह्या मनुष्यानें काय केलें आहे? |
| 36 He has beaten a woman, and stolen her nose-rings and a pair of silver bangles. | त्यानें एके बायकोस मारिलें, आणि तिची नथ व रुप्याचे गोटांचा जोड ह्यांची चोरी केली. |
| 37 When I got to the place, the prisoner was lying on the ground with his sword covered with blood. | मी त्या जाग्यावर जाऊन पोहचलों तेव्हां रक्तानें भरलेल्या तरवारीनिशीं कैदी भुईवर निजला होता. |
| 38 I caught hold of the prisoner by the wrist; but he gave me a sudden jerk and escaped. | मी कैदीचें मणगट पकडलें होतें, परंतु तो मला अकस्मात् हिसका देऊन सुटून गेला. |
| 39 You ought not to have released the prisoner without my permission. | माझा हुकूम घेतल्यावांचून त्वां कैदीस सोडून द्यावयाचें नव्हतें. |
| 40 If you had not followed the advice of your comrades, you would not have found yourself in this predicament. | तुह्मी आपल्या सोबत्यांच्या मसलती प्रमाणें चाललां नसतां, तर अशा पेंचांत पडलां नसतां. |
| 41 The plaintiff and defendant are both present, and each is anxious for justice. | वादी प्रतिवादी हे दोघे हजर आहेत, आणि आपला न्याय व्हावा अशी प्रत्येकास उत्कंठा आहे. |
| 42 Would you recognise the ornaments she wore, when you last saw her alive? | ती बायको मेल्यापूर्वीं तिची तुमची गांठ पडली, तेवेळेस तिच्या अंगावर जे दागिने होते ते तुह्मांला आज ओळखतां येतील काय? |

| | |
|---|---|
| 43 What length of time had elapsed from your first seeing the prisoner running and the time of your meeting the Police peons? | तुह्मी प्रथम कैदीस पळतांना पाहिलें, त्यानंतर किती वेळानें तुह्मांस पोलिसाचे शिपाई भेटले ? |
| 44 Did the Police peons endeavour to apprehend the prisoner? | पोलिसाचे शिपाई लोकांनीं कैदीस पकडण्याचा कांहीं यत्न केला काय? |
| 45 Did the prisoner stop before the Police peons called him, or after? | पोलिसाचे शिपायांनीं कैदीस हाका मारल्यापूर्वीं तो उभा राहिला किंवा मागून ? |
| 46 Might I not have been stooping, as well as lying or sitting down? | मी निजलों होतों, किंवा बसलों होतों, असें तुह्मी ह्मणतां; तर मी ओणवा नव्हतां असें कशावरून ? |
| 47 Your statements contradict themselves? | तुमचें एक बोलणें तुमच्या दुसरे बोलण्यास विरुद्ध येतें. |
| 48 Our orders with regard to that man are so extremely strict, that he is not allowed any indulgence whatever. | त्या मनुष्याबाबद आह्मांस इतका सक्त हुकूम झाला आहे कीं, कोणतेही गोष्टीविषयीं त्याजवर दया करितां येत नाहीं. |
| 49 In the conversation which took place between you and the Subhedar respecting the three Rupees, did you understand that he alluded to himself? | तुमचें सुभेदाराशीं जें तीन रुपयांबद्दल भाषण झालें, त्यांत तो स्वतास उद्देशून बोलला असें तुह्मी समजलां काय ? |
| 50 In the money transaction, do you mean to insinuate that he intended to cheat you, or merely that he got the best of the bargain? | त्या देवघेवेंत त्यानें तुह्मांस फसविण्याचा बेत केला, असा तुमचे ह्मणण्याचा भाव आहे काय, किंवा तींत त्यानें आपला नफा साधिला इतकेंच ? |

| | | |
|---|---|---|
| 51 | He led me to the next house but two, where I found the prisoner asleep with a bundle under his pillow. | त्यानें मला तेथून दोन घरें सोडून तिसरे घरांत नेलें, तेथें मी त्या कैदीला एक गांटोडें उशाखालीं घालून वर निजलेलें पाहिलें. |
| 52 | When you first went up to the prisoner, did he appear at all intoxicated ? | प्रथम तुह्मी कैदीजवळ गेलां, तेव्हां तो कांहीं झिंगलेला दिसला काय ? |
| 53 | Can you swear that this is the man who robbed you last night ? | ज्यानें तुह्मांस कालचे रात्रीस लुटलें तो हाच माणूस आहे, हें तुमच्यानें शपथ घेऊन सांगवेल काय ? |
| 54 | How far were you from the parties at the time the dispute took place ? | तंटा झाला त्यावेळेस त्या असामींपासून किती अंतरावर तुह्मी होतां ? |
| 55 | Did you go yourself to see him, and in what state did you find him ? | तुह्मी स्वतां त्याला पाहण्यासाटीं गेलां होतां काय, आणि कोणत्या स्थितींत त्याला पाहिलें ? |
| 56 | Could the defendant have struck the plaintiff in your presence without your observing it ? | प्रतिवादीनें वादीस तुमचे समक्ष मारिलें असतां, तें तुमच्या पाहण्यांत आलें नाहीं, असें संभवेल काय ? |
| 57 | He reported to me that the robber had killed four women, but that he was afterwards seized by a sepoy at the gate of the village. | त्या चोरानें चार बायका टार मारिल्या, त्यानंतर गांवचे वेशीजवळ एके शिपायानें त्यास पकडलें असा त्यानें मला रपोर्ट केला. |
| 58 | You expose yourself to the displeasure of Government by such refractory conduct, and you render yourself liable to be dismissed from your office. | अशा दांडगाईच्या वर्त्तणुकीनें सरकारच्या इतराजीस तुह्मी पात्र झालां, व चाकरींतून बरतर्फ होण्याची लायकी तुह्मांकडे आली. |
| 59 | Were you standing so near the prisoner that, if he had used these words, you must have heard him ? | हे शब्द कैदी बोलला असल्यास, ते ऐकिल्यावांचून तुमच्यानें न राहावें इतकें त्याचे नजीक तुह्मी होतां काय ? |

60 When the thieves saw us coming, they ran away; but our party went in pursuit of them; half in one direction and half in another, at last, we apprehended them all.

चोरांनीं आह्मांस येतांना पाहिलें, तेव्हां ते पळून गेले; परंतु आमचे लोकांपैकीं अर्धे लोक एका वाटेनें आणि अर्धे दुसऱ्या वाटेनें त्यांचा पाठलाग करीत गेले, व शेवटीं आह्मी त्या सर्वांस पकडलें.

61 Did you search the prisoner's person?

तुह्मी कैदीच्या आंगाचा झाडा घेतला काय ?

62 On searching him, I found a bunch of keys in his pocket, a tinder box, flint and match.

त्याचा झाडा घेतेवेळेस मला त्याचे खिशांत किल्यांचें जुडगें, चकमकीचें तोसदान, गार, आणि दिवेसळई इतकीं सांपडलीं.

63 Did any one attempt to rescue the prisoner from your custody?

तुमच्या हातांतून कैदीस सोडविण्याचा कोणी यत्न केला काय ?

64 It was not worthwhile to lodge a complaint against him for so trifling a matter.

अशा क्षुल्लक गोष्टीविषयीं त्याजवर फिर्याद करणें ह्यांत हांशील नाहीं.

65 I thought it would have been his turn to sit yesterday on the Jury; but it appears they have no regular list there, every one's name is drawn by lot, and he whose name comes out first sits first.

मला वाटलें कीं, काल जुरींत बसण्याची त्याची पाळी यावयाची होती; पण असें दिसतें कीं, बरोबर यादी ठेवीत नाहींत, व प्रत्येकाचें नांव चिठ्ठीनें काढतात आणि ज्याचें नांव पहिलें येतें, तो पहिल्यानें बसतो.

66 Did you seize the prisoner by the hand as he was in the act of taking the money?

कैदी पैका घेत असतां तुम्हीं त्याचा हात धरिला काय ?

67 Why did you deprive the woman of her reputation?

तुह्मीं त्या बायकोची कशासाटीं अब्रू घेतली ?

| | |
|---|---|
| 68 I will always protect you against any encroachment on your liberty, avenge you for any insult offered, and reimburse you for any loss you may sustain. | जर कोणी तुमच्या स्वतंत्रतेंत अडचण आणूं लागेल तर मी तुमचें रक्षण करीन, आणि जर कोणी तुमची बेअदबी करील तर मी त्याचा सूड घेईन, आणि जर तुमचें कांहीं नुकसान होईल तर तेंही भरून देईन. |
| 69 Did each confess that he himself had lost in gambling, or did they mutually tax each other with having lost? and if so, mention the amount. | मी स्वतां जुगारांत हरलों, असें प्रत्येकानें कबूल केलें काय? किंवा ते एकमेकांवर हरल्याचा दोष ठेवूं लागले? आणि असें आहे तर किती रुपये हरले तें सांग. |
| 70 Do you know any thing about the prisoner's having, on the seventh of last month, confessed being concerned in gambling? | गेले महिन्याच्या सातवे तारिखेस कैदी कबूल झाला कीं, जुगार खेळण्यांत मि[illegible]ो होतों, ह्याविषयींची तुह्मांस कांहीं माहिती आहे काय? |
| 71 I saw you holding him by the hair and beating him; and now do you deny it? | मीं तुह्मांस त्याचे केस धरून त्याला मारतांना पाहिलें, आणि आतां तुह्मी त्याविषयीं नाकबूल होतां काय? |
| 72 If the door had not been fastened, the thieves would have stolen the Company's property. | जर दार बंद नसतें तर कंपनीचा माल चोरांनीं चोरून नेला असता. |
| 73 Be careful what you say, as you are on your oath. | विचार करून बोला, कारण तुह्मीं शपथ घेतली आहे. |
| 74 I told you you would suffer if you persisted in such conduct. | जर तुह्मी दुराग्रहानें अशी वागणूक कराल, तर संकटांत पडाल ह्मणून मीं तुह्मांस सांगितलें होतें. |
| 75 Had you no suspicion that such an event was about to occur? | अशी गोष्ट घडणार आहे याची तुह्मांस कांहीं आगा आली नव्हती काय? |

| | |
|---|---|
| 76 Could the event he mentions, have occurred without his being in some degree privy to it? | जी गोष्ट तो सांगतो तींत त्याचें कांहीं तरी अंग असल्यावांचून, ती घडली असेल काय? |
| 77 Why did you try to conceal this fact from me? | कशासाठीं तुम्हीं ही गोष्ट मजपासून छपविण्याचा यत्न केला? |
| 78 Have you any suspicion against the prisoner? | त्या कैदीवर तुमचा कांहीं वहीम आहे काय? |
| 79 As I was searching the person of the prisoner, I found materials for house-breaking in his pocket. | मी कैदीच्या आंगाचा झाडा घेत असतां त्याचे खिशांत घर फोडण्याचीं हत्यारें सांपडलीं. |
| 80 Whilst you were taking the prisoner to Jail, did he make any opposition? | तुह्मीं कैदीस तुरंगांत नेत होतां त्यावेळेस त्यानें कांहीं हरकत केली काय? |
| 81 The laws of this country ensure justice between man and man. | ह्या देशाचा कायदा असा आहे कीं, सर्वांची दाद लागते. |
| 82 Appearing before the Court he was agitated. | कोर्टापुढें हजर झाला तेव्हां तो घाबरला. |
| 83 Do you think he could have seen you, had you been passing by that place? | तुह्मी त्या रस्त्यानें गेलां असतां तर त्यानें तुह्मांस पाहिलेंच असतें असें तुह्मांस वाटतें काय? |
| 84 Tell him that if he had not used such insulting language, the altercation would never have taken place. | त्याला सांग कीं, जर तूं असें निंदेचें भाषण बोलला नसतास तर कधीं ही झटपट झाली नसती. |
| 85 It is correct, that the defendant is really the daughter of the plaintiff. | हें खरें आहे कीं, प्रतिवादी ही वादीची मुलगी आहे. |
| 86 I signed this paper in the presence of two persons. | मीं दोन असामींचे देखतां, ह्या कागदावर सही केली. |

| | |
|---|---|
| 87 The plaintiff's name was then called three times in the usual manner, and the case nonsuited. | वादीस शिरस्तेप्रमाणें तीन वेळां हाक मारल्यावर खटला काढून टाकिला. |
| 88 I have been acquainted with the plaintiff six years. | सहा वर्षांपासून माझी व वादीची ओळख आहे. |
| 89 Does the witness owe you any thing? | हा साक्षीदार तुमचा कांहीं देणेदार आहे काय ? |
| 90 Soon after my arrival in this country, I desired the Marshall to send me a weekly return of all the prisoners in Jail. | ह्या देशांत आल्यावर लौकरच मी दरोग्यास ( मारशल ह्यास, ) हुकूम केला कीं, जे बंदीवान तुरुंगांत आहेत त्यांचें दर आठवड्याचें रिटर्न मजकडे पाठवीत जावें. |
| 91 Do you think there was sufficient light, and that the prisoner was in such a position that the old woman could have recognized him, as the thief, she had before seen inside the house? | ह्मातारीनें कैदीला पूर्वी घरांत पाहिलें होतें तर हाच चोर असा तो तिला ओळखतां यावा इतका उजेड होता, व कैदी तशा ठिकाणीं होता, असें तुह्मांला वाटतें काय ? |
| 92 Did you cause the prisoner to be released at 12 o'clock, as it is stated in the charges? | चार्जांत सांगितल्याप्रमाणें तुह्मीं कैदी बारा वाजतां खुला केला होता काय? |
| 93 Did you see the said money and the ornaments on the person of the prisoner? | सदरहू पैसा व कैदीचे अंगावरील दागिने तुह्मीं पाहिले काय ? |
| 94 He denied that he ever saw the prisoner? | कैदीस मीं कधींही पाहिलें नाहीं, असें तो ह्मणाला. |
| 95 He threatened to set my house on fire. | त्यानें माझ्या घरास आग लावण्याची धमकी दिली. |
| 96 As you have stated, that the defendant offered to pay you by monthly instalments of Rupees 2½ and you were willing to accept it; why did you afterwards complain? | तुह्मीं सांगितलें कीं, प्रतिवादी मला अडीच रुपये दर महिना हप्ता देण्यास कबूल होता, आणि मी घेण्यास राजी होतों, तर मग तुह्मीं फिर्याद कशाकरितां केली ? |

| | |
|---|---|
| 97 How long have you known the prisoner? | किती दिवसांपासून तुमची व ह्या कैदीची ओळख आहे ? |
| 98 What relation does the prisoner bear to you? | कैदी तुमचा कोण लागतो ? |
| 99 He said, the woman had borrowed from him thirty-three Rupees in silver, and ten in change, and promised to pay him within a week. | त्यानें सांगितलें कीं, त्या बायकोनें मजजवळून तेहतीस रुपये बंदे व दहा रुपयांचा खुर्दा कर्ज घेऊन वायदा केला होता कीं, एके आठवड्यांत फेड करीन. |
| 100 When I saw a crowd of people gathered together, I made my escape. | मी लोकांची गर्दी झालेली पाहिली, तेव्हां मी पळून गेलों. |
| 101 I recollect well his having shot at the prosecutor with a double barrelled gun. | मला चांगलें स्मरण आहे कीं, त्यानें फिर्यादीवर जोडनळीची बंदूक सोडली होती. |
| 102 Might the prisoner have made his escape without your seeing him? | तुझ्या दृष्टीस पडल्यावांचून ( तुझी दृष्टि चुकावून ) कैदी पळून गेल्याचा संभव आहे काय ? |
| 103 When did you see him last, since your arrival in Bombay? | तुह्मी मुंबईस आल्यावर, केव्हांपासून त्यास पाहिलें नाहीं ? |
| 104 We saw a man on the road with his head cut off, but we don't know who is the murderer. | आह्मी रस्त्यावर एक डोकें कापलेलें मनुष्य पाहिलें, परंतु त्यास मारणारा कोण, हें आह्मांस माहीत नाहीं. |
| 105 According to law, the son is heir to the father's property. | कायद्याप्रमाणें बापाच्या दौलतीचा वारस मुलगा आहे. |
| 106 You say that the prisoner was the ringleader of the mutineers last night, how could you recognize him, it being so dark? | तुह्मी सांगतां कीं, काल रात्रीं हा कैदी दंगा करणारे लोकांचा पुढारी होता; परंतु अशा अंधारांत तुमच्यानें त्यास कसें ओळखवलें ? |

107 I was standing close to the prisoner and kept a sharp look out upon him, I also took notice that he had a scar on his forehead, and can swear that the prisoner is the man.

मी कैदीजवळ उभा होतों आणि त्याजकडे जपून पाहत होतों, व त्याचे कपाळावर डाग आहे असें मीं पाहिलें, ह्यावरून हा कैदी तोच असामी आहे असें शपथ घेऊन मला सांगतां येईल.

108 Was the prisoner near enough to hear what you said to the camp follower?

तुह्मी त्या लष्करी मनुष्याला जें बोललां, तें ऐके इतका कैदी जवळ होता काय ?

109 I saw the prisoner beating his wife and pulling her along by her hair.

मी ह्या कैदीस आपले बायकोस मारतांना व तिचे केस धरून तिला ओढतांना पाहिलें.

110 How do you know that this is the man who beat the boy?

ज्या मनुष्यानें त्या मुलास मारिलें तो ह्राच हें तुह्मांस कशावरून ठाऊक आहे ?

111 When the robbery was committed where were you? and when you saw them running away with their plunder, why did not you immediately shout out, in order that people might come to your assistance?

चोरी झाली त्यावेळेस तुह्मी कोठें होता? आणि तुह्मी चोरास लूट घेऊन पळून जातांना पाहिलें, तेव्हां लोक तुमच्या मदतीस यावे ह्मणून तुह्मीं लागलीच आरडाओरड कां केली नाहीं ?

112 Whenever there is a robbery committed, it generally happens that the Government Puttewallas connive at it.

केव्हां जरी चोरी झाली, तरी बहुत करून असें होतें कीं, सरकारी शिपाई लोक त्या गोष्टीकडे कानाडोळा करितात.

113 Had the prisoner any intrigue with the deceased, before her death?

ह्या कैदीची त्या मयत स्त्रीच्या मरणापूर्वीं तिच्याशीं कांहीं दोस्ती होती काय ?

114 Can you unhesitatingly deny that you were the person conversing with the prisoner when he was about to drop from off the Jail wall ?

हा कैदी तुरंगाचे भिंतीवरून उडी मारण्याचे विचारांत होता, ते वेळेस जो असामी त्याचे बराबर बोलत होता, तो मी नव्हे, असें तुमच्यानें निक्षूण सांगवेल काय ?

115 When you apprehended the prisoner, as he was about to step into a boat at the Bunder in the dockyard, had he any hand-cuffs on ?

तुह्मीं कैदीस गोदीबंदरावर होडींत चढतांना पकडलें, त्यावेळेस त्याचे हातांत बेडी होती काय ?

116 When the robbery was committed, had a person been sleeping in the house, would he not have been awakened by the noise occasioned by the thieves ? Speak the truth, and fear nothing.

चोरी झाली तेव्हां घरांत एखादा मनुष्य निजला असता तर तो चोरांच्या गोंगाटानें जागा झाला नसता काय? खरें सांग, भिऊं नको.

117 The one witness has sworn that the night was so dark you could not see more than ten or fifteen yards in front, while the other swears it was bright moonlight, how can you therefore place any reliance upon the evidence of either ?

एक साक्षीदार शपथ घेऊन बोलतो कीं, रात्र इतकी अंधारी होती कीं, दहा पंधरा यार्डांच्या पलीकडे समोर कांहीं दिसत नव्हतें, आणि दुसरा शपथ वाहून सांगतो कीं, उजळ चांदणें होतें; ह्मणून ह्या दोघांतून एकावर तरी तुमच्यानें भरंवसा कसा ठेववतो ?

118 I do not see why you should disbelieve the evidence of both : the first is a respectable man and would not give false evidence, while the second is a known blackguard.

तुह्मी दोघांचीही साक्षी खोटी कां मानितां हें मला समजत नाहीं. पहिला साक्षीदार अब्रूचा मनुष्य आहे आणि तो खोटी साक्ष देणार नाहीं आणि दुसरा तर प्रसिद्ध लुच्चा आहे.

| | |
|---|---|
| 119 That is very true, but the Court must not be led away by anything that may have come to its ears by private report, but must judge by the evidence laid publicly before it. | ही गोष्ट खरी आहे, परंतु कोर्टास योग्य आहे कीं, बाहेरील ज्या गोष्टी कानावर येतात, त्यांवर विश्वास ठेवूं नये; परंतु जी साक्ष उघड रीतीनें कोर्टाच्या समोर येईल तीवरून इनसाफ केला पाहिजे. |
| 120 Previous to the occasion of which you speak, had you ever heard reports about his ill usage of his wife? | त्या मनुष्यानें अमुक वेळेस आपले बायकोस जाचणूक केली, असें तुह्मी बोलतां, तर त्याचे पूर्वीं ह्या प्रकरणीं तुमच्या ऐकण्यांत कधीं कांहीं आलें होतें काय? |
| 121 Well, tell him he will not be punished on this occasion; but if he again commit a similar offence, he cannot escape; it is his good character alone that saves him now. | बरें, त्याला सांगा कीं, ह्या प्रसंगीं तुला शिक्षा होणार नाहीं; परंतु ह्याप्रमाणें फिरून जर गुन्हा करशील तर सुटणार नाहींस; आतां सुटलास तो फक्त तुझ्या चांगल्या अब्रूनें सुटलास. |
| 122 I have a mind to pardon this man, because, though it is quite clear that he is the actual perpetrator of the offence, still I am convinced he was instigated to it by some person who was interested in its commission. | ह्या मनुष्यास गुन्हा माफ करावा असें माझ्या मनांत येतें, कारण कीं, गुन्हा ह्यानेंच केला असें जरी उघड आहे, तरी ज्याला ह्या कामापासून कांहीं लाभ व्हावयाचा अशा कोणीं मनुष्यानें शिकविल्यावरून ह्यानें गुन्हा केला अशी माझी खातरी आहे. |
| 123 Do you remember having said that on the night of the 25th ultimo, a man was way laid on the road between Panwell and Poona, and that, to all appearance, the act must have been committed by Police peons? | गेल्या महिन्याचे २५ वे तारखेस पनवेल व पुणें ह्यांच्या मधील रस्त्यांत एका मनुष्यास कोणीं लुटलें. आणि असें वाटतें कीं, हें काम पोलिसाचे शिपायांनीं केलें असावें, ह्मणून तुह्मी बोललां, ह्याचें तुह्मांस स्मरण आहे काय? |

| | | |
|---|---|---|
| 124 | He goes about in the Bazaar falsely stating that I have beaten and otherwise ill used his son, who is a horse-keeper in my service; and as this report is highly prejudicial to me, inasmuch as it prevents respectable men from entering my service, you must warn him to desist, otherwise I must prosecute him. | तो मजविषयीं बाजारांत खोटें बोलत फिरतो कीं, फलाण्या साहेबांचे घरीं माझा मुलगा घोडयाच्या चाकरीवर आहे, त्याला ह्या साहेबानें शिव्या दिल्या, व मारिलें, ह्या गोष्टींत माझी फार नुकसानी आहे, कारण कोणी अब्रूवाला माणूस माझे चाकरीस राहण्यास दिक्कत खाईल, ह्यासाटीं तुह्मी त्यास ताकीद द्या कीं, ही गोष्ट सोडून दे, नाहीं तर मला त्यावर फिर्याद करावी लागेल. |
| 125 | When he came near you, would he have struck you, had his hat not fallen off? | तो तुझ्या जवळ आला, तेव्हां जर त्याची टोपी पडली नसती, तर तो तुला मारता काय ? |
| 126 | Should he have left the place before your reaching it, be sure to make inquiry concerning the circumstances attending his escape? | तुह्मीं तेथें पोंचल्यापूर्वीं तो तेथून निघून गेला असला, तर तो कसा पळून गेला ह्याविषयीं चौकशी खचीत केली पाहिजे. |
| 127 | Are written agreements common in this country? and are witnesses and signatures necessary? | ह्या देशांत करारनामा लिहून घेणें व देणें ह्याची चाल फार आहे काय? आणि ह्यांवर साक्ष व सही हीं करावयास पाहिजेत काय ? |
| 128 | What do you do with the money you receive on the mortgage of your land? | तुह्मी आपली जमीन गहाण टेवून रुपये घेतां त्याचें काय करतां ? |
| 129 | According to the agreement of the bond of mortgage, your time is out. | गहाणखताचे बोलीप्रमाणें तुमची मुदत पुरी झाली. |
| 130 | You must be punished for bringing such a false charge. | अशी खोटी फिर्याद केल्याबद्दल तुला शिक्षा दिली पाहिजे. |
| 131 | When he struck you, why did you not make a complaint? | त्यानें तुला मारिलें तेव्हां त्वां फिर्याद कां केली नाहीं ? |

| | | |
|---|---|---|
| 132 | Since the Patell died, who has discharged his duties? | पाटील मेल्यापासून त्याचें काम कोण चालवितो ? |
| 130 | Are there any great merchants in this district? and are their names written in your account book? | ह्या परगण्यांत कोणी मोठाले व्यापारी आहेत काय ? आणि त्यांचीं नांवें तुमच्या वहींत लिहिलीं आहेत काय ? |
| 134 | He says one thing, and you say another. | तो एक सांगतो, आणि तुह्मी दुसरें सांगतां. |
| 135 | I will not attend to his complaint. | मी त्याची फिर्याद ऐकणार नाहीं. |
| 136 | What was the object of their coversation? | त्यांचे बोलण्याचा विषय कोणता होता? |
| 137 | I have told you all that happened from first to last. | आरंभापासून शेवटपर्यंत जें झालें तें सर्व मी तुह्मांस सांगितलें आहे. |
| 138 | He threatened him with many violent gestures. | त्यानें त्याला दांडगाईचे पुष्कळ हातवारे दाखवून धमकाविलें. |
| 139 | How do you know that this is the very man who struck you? | ज्यानें तुह्मांस मारिलें, तो हाच मनुष्य आहे हें तुह्मी कशावरून समजतां? |
| 140 | I recognized his voice whilst he was conversing with his companions. | तो आपल्या सोबत्यांबरोबर गोष्टी करीत असतां, मी त्याचा शब्द ओळखिला. |
| 141 | How long before that time were you acquainted with him? | त्याचे पूर्वीं तुमची त्याची केव्हांपासून ओळख होती ? |
| 142 | I have known him from his infancy; he lived for many years in my neighbourhood. | त्याचे बाळपणापासून त्याची माझी ओळख आहे, फार वर्षें तो माझे शेजारीं राहत होता. |
| 143 | Who was his companion? and how close were you to them when you heard them conversing? | त्याचा सोबती कोण होता ? आणि तुह्मीं त्यांना बोलतांना ऐकिलें, तेव्हां त्यांपासून किती अंतरावर होतां ? |
| 144 | I do not know who was his companion; but they were distant about one or two paces from me. | त्याचा सोबती कोण होता, हें मला ठाऊक नाहीं, परंतु ते मजपासून एक दोन पावलांचे अंतरावर होते. |

| | | |
|---|---|---|
| 145 | Can you tell me where the man went after striking you? | तुला मारल्यावर तो मनुष्य कोठें गेला हें तुझ्यानें सांगवतें काय? |
| 146 | He went direct to his own house, and I followed him quietly, so that he should not perceive me. | तो नीट आपले घरीं गेला, आणि मी गपचूप त्याचे पाठीमागून चाललों अशा रीतीनें कीं, त्याच्यानें मला पाहवलें नाहीं. |
| 147 | Was he constantly in view when you followed him to his house, or did you, for any short interval, lose sight of him? tell truly. | तुह्मीं त्याच्या पाठीमागें घरापर्यंत गेलां तेव्हां तुमची नजर त्यावर एकसारखी होती, किंवा मध्यें कांहीं वेळ तरी सुटली होती? खरें बोला. |
| 148 | I cannot declare that I never lost sight of him, for sometimes we were separated by a considerable distance, but I very soon recovered sight of him after losing it for a short time. | माझी नजर त्यावरून कधीं सुटली नव्हती असें माझ्यानें कांहीं स्पष्ट सांगवत नाहीं; कारण कीं, कांहीं वेळपर्यंत आमच्या मध्यें बरेंच अंतर पडलें होतें, परंतु थोडीशी सुटल्या नंतर लवकरच माझी नजर फिरून त्यावर पडली. |
| 149 | With what did he strike you? | त्यानें तुह्मांस कशानें मारिलें? |
| 150 | The night was dark, and I could not see exactly; but I believe it was a thick stick. | रात्र अंधारी होती ह्मणून मला बरावर पाहतां आलें नाहीं, परंतु त्याजवळ जाडी काठी होती असें मला वाटतें. |
| 151 | Did you cry out when you were hurt by him? | त्यानें तुह्मांस दुखापत केली तेव्हां तुह्मी मोठ्यानें ओरडलां काय? |
| 152 | I cried out repeatedly, but no body came to assist me. | मी अनेक वेळां ओरडलों, परंतु कोणी माझे मदतीस आलें नाहीं. |
| 153 | If the prisoner had not imitated the example of his own brother in depriving his wife of life, he would not have been executed in the prime of life. | ह्या कैदीनें आपल्या भावाचे वळणावर जाऊन आपल्या बायकोचा जीव घेतला नसता, तर तो तरुण वयांत फाशीं कां जाता? |

| | | |
|---|---|---|
| 154 | The complaint was made for the purpose of traducing his character. | त्याची अब्रू घेण्यासाठीं त्यानें ही फिर्याद केली. |
| 155 | If you had gone into the house, are you sure you would have been able to see him ? | जर तुह्मी त्या घरांत गेलां असतां, तर तुह्मी त्याला पाहिलें असतें अशी तुमची खात्री आहे काय ? |
| 156 | Might it not have been possible for the prisoner to be in the house without your seeing him ? | तुमच्या दृष्टीस पडल्याशिवाय त्या घरांत कैदी असण्याचा संभव नव्हता काय ? |
| 157 | Did he strike him with his open hand or with his clenched first ? | त्यानें त्याला चपराक मारिली किंवा ठोसा मारिला ? |
| 158 | When you went into the hous eof the prisoner, was he in a state of intoxication ? | तुह्मी कैदीचे घरीं गेलां तेव्हां तो छाकटा होता काय ? |
| 159 | On your telling the prisoner to go to the right about, did he refuse to do so ? | तुह्मीं त्या कैदीला माघारें उलटायास सांगितलें, तेव्हां त्यानें तसें करण्यास नाकारलें काय ? |

# MERCANTILE PHRASES.

| ENGLISH. | मराठी. |
|---|---|
| 1 How much per cent. interest do the bankers of this country give ? | ह्या देशांतील सावकार लोक शेंकडा किती टक्के व्याज देतात ? |
| 2 Nine per cent., if you borrow, but when you lend, you cannot get more than six per cent. | तुह्मीं कर्जी रुपये घ्याल तर शेंकडा नऊ टक्के व्याज देणें पडेल आणि कर्जी द्याल, तर सहा टक्यांपेक्षां जास्ती व्याज मिळणार नाहीं. |
| 3 How many bales of cotton were shipped yesterday ? | काल कापसाचे किती गट्ठे गलबतावर चढविले ? |
| 4 Two hundred and fifty, and one hundred and fifty will go to-day. | काल अडीचशें गट्ठे गेले, आणि आज दीडशें जातील. |
| 5 What are the imports and exports, and what is the current coin of this Port ? | ह्या बंदरांत काय काय माल येत असतो व येथून काय काय माल जात असतो आणि येथें कोणतें नाणें चालतें ? |
| 6 Did you pay duty for these goods in the Custom house or not ? | तुह्मीं ह्या मालाची जकात मांडवींत भरली किंवा नाहीं ? |
| 7 At what rate of Exchange did you get this bill ? | तुह्मीं ही हुंडी कोणत्या भावानें घेतली ? |
| 8 Have you made any agreement with him ? | तुह्मीं त्याच्या बरोबर कांहीं ठराव केला आहे काय ? |
| 9 He is willing to allow five per cent. discount for ready money. | रोख पैसा मिळेल, तर शेंकडा पांच टक्के कापून देण्यास तो राजी आहे. |

| | |
|---|---|
| 10 It was a Bill drawn upon me by my brother in favor of Mr. Smith at six months' sight. | माझ्या भावानें स्मिथ साहेबाच्या नांवाची एक हुंडी सहा महिन्यांच्या मुदतीची मजवर लिहिली होती. |
| 11 Not having sufficient funds of his in my hands to accept the bill, I did not honor it. | माझ्या जवळ त्याचे रुपये पुरे नव्हते ह्मणून मी त्याची हुंडी सकारली नाहीं. |
| 12 What did you give in pledge for the money you say the banker advanced to you yesterday? | तुह्मी सांगतां कीं, सावकारानें मला काल रुपये दिले. त्या रुपयांबद्दल तुह्मीं सावकारास काय गहाण (तारण) लावून दिलें आहे. |
| 13 I mortgaged my house to Mr. Jones. | मी आपलें घर जोन्स साहेबापाशीं गहाण ठेविलें. |
| 14 Show me my account, as I wish to see whether there is a balance in my favor. | माझें खातें मला दाखीव ह्मणजे त्यांत माझी कांहीं बाकी निघते किंवा नाहीं तें पाहीन. |
| 15 Buy me ten yards of cloth. I will pay for it tomorrow, but do not come yourself for it. | माझेसाटीं दहा वार कापड विकत घ्या, त्याचा पैसा मी उद्यां तुह्मांस देईन, पण आपण स्वतां घेण्यास येऊं नका. |
| 16 A ship is expected daily. | आजउद्यां गलबत येण्याची वाट आहे. |
| 17 Your claim of one hundred Rupees has been compromised for fifty-five Rupees. | तुमच्या शंभर रुपयांची तोड जोड पंचावन्न रुपयांवर केली आहे. |
| 18 Whenever a vessel is to sail for China, let me know without delay. | गलबत केव्हांही चिनेस जाऊं लागलें ह्मणजे लागलीच मला खबर दे. |
| 19 How long will the matter stand thus? | ही गोष्ट कोठपर्यंत अशाची अशीच राहणार. |
| 20 I am a retailer of merchandise of various sorts. | मी हरएक जिनस फुटकळ विकतों. |
| 21 He is a wholesale dealer. | तो घाऊक विकणारा आहे. |

| | |
|---|---|
| 22 What do you think of the flavour of this tea? | ह्या चहाचा स्वाद तुह्मांस कसा लागतो? |
| 23 I have let my house to Mr. Jones for three hundred Rupees per month. | मी आपलें घर दरमहा तीनशें रुपये भाड्यानें जोन्स साहेबास दिलें आहे. |
| 24 I have rented a house from him at two hundred Rupees per annum. | दरसाल दोनशें रुपये देण्याचें ठरवून त्यापासून मी एक घर भाड्यानें घेतलें आहे. |
| 25 I have a piece of uncultivated ground in the Fort. | किल्ल्यांत पडीत जमिनीचा एक तुकडा मजकडे आहे. |
| 26 This bill has six months to run. | ह्या हुंडीला सहा महिने भरले पाहिजेत. |
| 27 He assigned his debt to Mr. Jones. | त्यानें आपले देण्याचा हवाला जोन्स साहेबास दिला आहे. |
| 28 Cotton is the staple commodity of Bombay. | मुंबईंत सर्वांत मोठा व्यापार कापसाचा आहे. |
| 29 He sold all his cotton at prime cost. | त्यानें आपला सगळा कापूस मुदलामुदल विकला. |
| 30 Here are a thousand Rupees, place them to my credit. | हे हजार रुपये आहेत हे माझ्या खात्यावर जमा करा. |
| 31 Give Mr. Smith a thousand Rupees, and place them to my account. | स्मिथ साहेबास हजार रुपये देऊन माझे नांवें लिहा. |
| 32 The man has arrived, and has brought your Rupees. | तो मनुष्य येऊन पोंहचला, आणि त्यानें तुमचे रुपये आणिले आहेत. |
| 33 You must get these things on credit, if you have not sufficient money to pay for them now. | आतां तुमच्या जवळ रोख पैसा नसला तर हे सर्व जिनस तुह्मांस उधार घेतले पाहिजेत. |
| 34 He wishes to insure his ship for forty thousand Rupees, but the underwriters ask too high a premium. | तो आपल्या तारवाचा ४०,००० रुपयांचा विमा उतरण्यास इच्छितो, परंतु विमेकरी पुष्कळ मनोती मागतात. |

| | |
|---|---|
| 35 They cost on an average three hundred Rupees each. | प्रत्येक जिनसास सरासरी तीनशें रुपये खर्च येतो. |
| 36 He drew on me one bill at sight and another at ten days' sight. | त्यानें मजवर एक हुंडी दर्शनी व दुसरी दहा दिवसांचे मुदतीची लिहिली. |
| 37 A merchant lately failed for eight lacks of Rupees; and it is likely that he will only pay four Annas in the Rupee. | थोडे दिवसांपूर्वीं एका व्यापाऱ्यानें आठ लक्षांचें दिवाळें काढिलें, आणि असें वाटतें कीं, तो रुपयाचे चार आणे देईल. |
| 38 That man wishes to lend me five hundred Rupees at nine per cent. interest, and a premium of sixty Rupees; and that the debt be repaid by instalments. | तो मनुष्य शेंकडा नऊ टक्के व्याज व साठ रुपये मनोती घेऊन मला पांचशें रुपये देण्यास इच्छितो; व तें सर्व कर्ज हप्तेबंदीनें फेडावें असें ह्मणतो. |
| 39 I am bound to pay the amount of this bill, because I became responsible for it. | ह्या हुंडीची रकम मला द्यावी लागते, कारण तिची जबाबदारी मी आपल्यावर घेतली होती. |
| 40 The cloth which I purchased from you sometime ago is twice the width of that which I bought from him. | थोड्या दिवसांपूर्वीं जें कापड मीं तुह्मांपासून विकत घेतलें होतें, त्याची रुंदी त्याजपासून कापड घेतलें त्याचे दुप्पट आहे. |
| 41 How much pure gold, and how much alloy are there in this coin? | ह्या नाण्यांत चोख सोनें किती आणि भेळ किती आहे ? |
| 42 Deducting this from the amount, what will be the balance? | ह्या रकमेंतून इतकें बाद केलें असतां बाकी किती राहील ? |
| 43 What goods generally come in your ship? | तुमच्या तारवांत बहुतकरून कोणता माल येतो ? |
| 44 When you bought this merchandise, was this man your partner or not? | तुह्मीं हा माल खरेदी केला तेव्हां हा मनुष्य तुमचा भागीदार होता कीं नाहीं ? |

| | |
|---|---|
| 45 Last year the supply of cotton was small. | सालगुदस्तां कापूस थोडा आला होता. |
| 46 In China, the opium market is very dull, but the cotton one is very brisk. | चिनेस अफूची मंदी आहे, परंतु कापसाची तेजी आहे. |
| 47 Do you know how cotton sold last year? | गुदस्तां कापूस कोणत्या भावानें विकला होता हें तुह्मांस टाऊक आहे काय ? |
| 48 What is the reason cotton was so dear last year? | गतवर्षीं कापूस महाग होण्याचें कारण काय होतें ? |
| 49 Was it in consequence of a bad crop; or that less was brought than usual? | पीक चांगलें न आल्यामुळें असें झालें, किंवा माल वर्षापेक्षां थोडा आला ह्मणून ? |
| 50 Is there much smuggling carried on in this country among the merchants? | ह्या देशांत व्यापारी लोकांमध्यें जकात चुकवून माल आणण्याचें काम फार चाललें आहे काय ? |
| 51 What trade is chiefly carried on between Bombay and China? | मुंबई आणि चीन ह्यांच्यामध्यें मुख्यत्वें करून व्यापार कोणता चालतो ? |
| 52 Is the demand for cotton greater in China or in England? | कापसाचा खप चीन देशांत फार आहे किंवा इंग्लंडांत ? |
| 53 In what manner is cotton stored before it is screwed, and how do they preserve so bulky a commodity from the weather? | गिरणींत घालून दाबण्यापूर्वीं कापूस कोणत्या रीतीनें वखारींत भरतात आणि अशा मोठे अवजड जिनसास पावसापासून कसें राखितात ? |
| 54 How many Beeghas of land have you bought? | तुह्मीं किती बिघे जमीन विकत घेतली आहे ? |
| 55 Last year how much corn was produced in that district? | गेल्या वर्षीं त्या प्रांतांत किती धान्य उत्पन्न झालें होतें ? |
| 56 How many Rupees did you give in part payment of this Bond? | ह्या खताचे पोटीं तुह्मीं किती रुपये दिले आहेत ? |

| | |
|---|---|
| 57 What property has he left on trust with you? | त्यानें तुमच्या जिम्मेस काय माल टेविला आहे. |
| 58 What time would you take to clear off the whole demand? | सारें मागणें फेडण्यास तुह्मांला किती दिवस लागतील ? |
| 59 By all means settle my accounts. | कसेंही करून माझा हिशेब चुकवून द्या. |
| 60 Did the ship arrive at her destination? | तें तारूं ज्या जागीं जायाचें होतें, तेथें जाऊन पोंहचलें ? |
| 61 Did he give you an account of the mis-appropriation of the things entrusted to him? | जे जिनस त्याच्या स्वाधीन केले होते त्यांची अफरातफर झाली, त्या गोष्टीचा मजकूर त्यानें तुह्मांपाशीं सांगितला काय ? |
| 62 Did he bring you a sample of that article of which he had spoken to you before? | ज्या वस्तूविषयीं तो तुह्मांपाशीं पूर्वी बोलत होता त्याचा नमुना तुह्मांकडे त्यानें आणिला काय ?. |
| 63 I paid him three hundred Rupees including the earnest money which I had given him sometime before. | पूर्वीं दिलेल्या बयाण्यासुद्धां एकंदर तीनशें रुपये मीं त्यास दिले. |
| 64 How much did this house cost? | ह्या घराबद्दल खर्च काय आला ? |
| 65 He borrowed two hundred Rupees from him at the rate of one per cent. interest. | त्यानें एकोत्र्याच्या व्याजानें त्यापासून दोनशें रुपये घेतले. |
| 66 The ship leaks so much that she must be pumped out twice a day. | ह्या गलबतांत इतकें गमत भरतें कीं, दिवसांत दोन वेळां उपसून टाकलें पाहिजे. |
| 67 I have drawn on Mr. Haselwood in your favor for fifty Rupees; the draft will not be dishonored. | मीं एक हुंडी पन्नास रुपयांची तुमचे नांवची हेजल उडसाहेबावर लिहिली आहे, ती तो नकारणार नाहीं. |
| 68 What is the most important article of trade in that country, and what things are produced in the greatest abundance? | त्या देशांत व्यापाराचा मोठा जिनस कोणता आहे; आणि कोणते जिनस पुष्कळ उत्पन्न होतात ? |

| | |
|---|---|
| 69 I drew a bill on Mr. so and so which he dishonored. | मी एक हुंडी फलाण्या गृहस्थावर लिहिली होती ती त्यानें सकारली नाहीं. |
| 70 I lent him ten Rupees the other day upon short promise, but he has not repaid them yet. | कांहीं दिवसांपूर्वीं मी त्याला दहा रुपये थोडे दिवसांचे वायद्यानें दिले, परंतु त्यानें अद्याप ते परत दिले नाहींत. |
| 71 If you can get me that piece of cloth at prime cost, I will take it. | तुह्मीं तें थान ( ताका ) मुद्दल भावानें आणून द्याल तर मी घेईन. |
| 72 If the news had arrived two days before, the price would have been affected. | हें वर्त्तमान दोन दिवसांपूर्वीं आलें असतें, तर भाव बदलला असता. |
| 73 Go and find out the particulars, whether it is to be disposed of by public or private sale. | जा आणि खबर काढ कीं, हा जिनस लिलावांत विकावयाचा आहे, किंवा घर मेळीं. |
| 74 The day before yesterday, the ship *Charles Forbes* arrived at Bombay from China in twenty-seven days. | परवांचे दिवशीं **चार्लस फारबस** नांवाचें जें गलवत चिनेहून आलें तें सत्तावीस दिवसांनीं मुंबईस येऊन पोंहचलें. |
| 75 I have heard that this year, the merchants have experienced a great loss in Opium, on account of there being an oversupply of that commodity there. | माझे ऐकण्यांत आलें आहे कीं, ह्या वर्षीं व्यापारी लोकांस अफिणीचे व्यापारांत फार नुकसान झालें, त्याचें कारण असें आहे कीं, ( ह्या वर्षीं ) तेथें पुष्कळ माल जाऊन पडला. |
| 76 They say that the merchants have got a good price for cotton, because a ship that left this port with a cargo of it had sunk at sea in consequence of a storm; that is the reason of the price having risen. | व्यापारी लोकांस कापसाचा भाव चांगला आला, कारण कीं, एक गलवत कापूस भरून ह्या बंदरांतून हकारल्यावर तुफानामुळें समुद्रांत बुडालें, तेणेंकरून कापसाचा भाव चढला, असें लोक सांगतात. |

77 Do you know who was the owner of the ship that was lost, and what was her name, and the name of the Commander?

जें गलबत बुडालें त्याचा धनी कोण, आणि त्या गलबताचें व त्यावरील कप्तानाचें नांव काय, हें तुह्मांस ठाऊक आहे काय?

78 I do not know; but I heard the owner was a Parsee merchant, and the name of the ship was *Kader Buckhsh.*

मला माहीत नाहीं, पण मीं ऐकिलें आहे कीं, त्या गलबताचा धनी एक पारशी व्यापारी आहे आणि तारवाचें नांव कादरबक्श होतें.

79 Can a better article than this be procured within a hundred miles' distance? if so, I would rather send for it; otherwise I must content myself with what is procurable here.

पन्नास कोसांचे आंतून ह्यापेक्षां चांगला जिनस आणतां येईल तर मी खुषीनें मागवीन, नाहीं तर जो कांहीं येथें मिळेल त्यावर समाधान पावून मला राहिलें पाहिजे.

80 Where is grain sold by wholesale here?

येथें धान्याचीं साटीं कोठें होतात?

81 This article is sold by retail in the next market.

हा जिनस शेजारचे बाजारांत किरकोळ विकतात.

82 Come, take a Rupee earnest money for the price of that cloth, and my servant will bring the price you ask and carry the cloth hence.

चला, ह्या थानाचा एक रुपया बयाना घ्या आणि जी किंमत तुह्मीं मागत आहां, ती माझा चाकर आणून देईल, आणि थान घेऊन जाईल.

83 Tell me in one word your lowest price.

एकच बोला, निदान तुह्मी काय घ्याल.

84 What rate of interest do you now get for your money?

हल्लीं तुह्मांस तुमचे पैक्याचें व्याज कसें मिळतें?

85 When I was in England, all the merchants there were complaining that they would be ruined, and that is only nine months ago.

मी इग्लंडांत होतों तेव्हां सर्व व्यापारी लोक, आह्मीं बुडणार आहों ह्मणून ह्मणत होते, ह्या गोष्टीस आज नऊ महिने मात्र झाले.

| | |
|---|---|
| 86 I suppose that some are always getting rich, and some are ruined by their own plans. | मला वाटतें कीं, कांहीं व्यापारी लोक स्वतांच्या कल्पनेनें नेहेमीं पैसा मिळवितात आणि कांहीं बुडून जातात. |
| 87 Why do merchants give less interest now? | हल्लीं व्यापारी लोक थोडें व्याज कां देतात? |
| 88 Since trade has diminished the merchants require less money, and on this account give less interest. | व्यापार कमी झाल्यापासून व्यापारी लोकास पैशाची गरज थोडी लागते म्हणून थोडें व्याज देतात. |
| 89 They say that Government intends to open a new loan; will this benefit monied men? | व्याजाच्या नोटी काढण्याचा सरकारचा इरादा आहे असें लोक म्हणतात, तर ह्या गोष्टीनें पैकेकऱ्यांस फायदा होईल काय? |
| 90 Those rich men who do not trade, but live upon the interest of money, will profit by it; the merchants will lose. | जे मातबर लोक व्यापार करीत नाहींत आणि स्वतांचे पैक्याचे व्याजावरच गुजारा करितात, त्यांस मात्र फायदा होईल; परंतु व्यापारी लोकांचें नुकसान होईल. |
| 91 Does the best cotton come from Surat or Bhownagar? | सर्वांपेक्षां चांगला कापूस कोठून येतो. सुरतहून किंवा भावनगराहून? |
| 92 Though the Surat cotton is very fine, yet it does not come up to the Bhownagar. | सुरतचा कापूस चांगला असतो, पण भावनगरच्या कापसाच्या बरोबरीला नाहीं. |
| 93 Last year the supply of cotton was small. | गतवर्षीं कापूस थोडा आला होता. |
| 94 In China there is very little demand for opium. | चिनंत अफिणीचा खपत्कार थोडाआहे. |
| 95 Have you insured your property or not? | तुह्मीं आपल्या मालाचा विमा दिला आहे किंवा नाहीं? |
| 96 Is this ship your own, or are there any partners in it? | हें गलबत स्वतांचें तुमचेंच आहे, किंवा ह्यांत दुसरे कोणी भागीदार आहेत? |

| | |
|---|---|
| 97 In this ship there are three partners. One half is mine, and in the other half there are two partners. | ह्या गलबतांत तीन भागीदार आहेत, अर्धा भाग माझा आहे, आणि दुसरे अर्धे भागांत दोन भागीदार आहेत. |
| 98 A merchant has become bankrupt, and has absconded. | एक व्यापारी दिवाळं काढून लपून बसला आहे. |
| 99 How many Beeghas of land have you bought, and what annual rent does it yield ? | किती बिघे जमीन तुह्मीं विकत घेतली आहे आणि दर वर्षास तिचा वसूल तुह्मांस किती येतो ? |
| 100 Is there your mark upon these bales ? | ह्या गठ्यांवर तुमची कांहीं निशाणी आहे काय ? |
| 101 Every sort of merchandise sells at a good price. | हरएक जातीचा जिनस चांगले भावानं विकतो ? |
| 102 What sort of goods did the last ship bring that came from China ? | शेवटचं गलबत जं चिनहून आलं त्यांत काय माल आला ? |
| 103 What is the usual price of cotton ? | कापसाचा नेहमींचा भाव काय असतो? |
| 104 Many persons have been ruined in this trade. | ह्या व्यापारांत पुष्कळ लोक बुडाले आहेत. |
| 105 Is the cotton or the opium trade the more profitable ? | कापसाच्या व्यापारांत नफा फार होतो किंवा अफूच्या ? |

# MEDICAL PHRASES.

| ENGLISH. | मराठी. |
|---|---|
| 1 What is the matter with you? | तुह्मांस काय झालें आहे? |
| 2 I have got fever. | मला ताप आला आहे. |
| 3 When were you taken ill? | तुमची प्रकृति केव्हां बिघडली? |
| 4 Last night at bed time. | काल रात्रीं निजावयाचे वेळेस. |
| 5 What do you complain of? | तुह्मांस काय होतें? |
| 6 I have severe pain in the head and giddiness; my skin is very hot and I feel thirsty. | माझें डोकें दुखतें, भोंवळ येते, आंग फार कढत झालें आहे व तहान फार लागते. |
| 7 Let me feel your pulse. | तुमची नाडी पाहूं द्या. |
| 8 Show me your tongue. | तुमची जीभ दाखवा. |
| 9 Have you a bad taste in your mouth? | तुमचें तोंड वाईट झालें आहे काय? |
| 10 Yes, I have great clamminess, and a very bitter taste in my mouth, especially in the morning. | होय, माझें तोंड फार चिकट व कडू झालें आहे, हें बहुतकरून सकाळीं होत असतें. |
| 11 Have you any sickness at the stomach? | तुमच्या पोटांत कांहीं कळमळतें काय? |
| 12 Yes, I have, and last night I vomited once. | होय. मला काल रात्रीस एकदां वांति झाली. |
| 13 Was the matter you vomited bitter? | वांति झाली ती कडू होती काय? |
| 14 Yes, very bitter indeed. | होय, फारच कडू होती. |
| 15 Have you any appetite? | तुह्मांस भूक लागते काय? |
| 16 Very little. | फार थोडी. |
| 17 Are your bowels regular? | तुह्मांला रोज शौचास होतें काय? |
| 18 I am rather costive. | माझा कोठा कांहींसा जड आहे. |

| | |
|---|---|
| 19 When were your bowels opened? | तुह्मांला शौचास केव्हां झालें होतें ? |
| 20 This morning. | आज सकाळीं. |
| 21 Have you any pain in your limbs? | तुमच्या हातांपायांत कांहीं कळा मारतात काय ? |
| 22 No, except in my head. | नाहीं, डोक्याशिवाय माझें दुसरें कांहीं दुखत नाहीं. |
| 23 What do you think is the cause of your illness? | तुह्मांला दुखणें कशापासून झालें ह्मणून तुह्मांला वाटतें ? |
| 24 Getting wet three or four days ago. | तीनचार दिवसांपूर्वीं मी भिजलों होतों. |
| 25 You must take an emetic. | तुह्मांस उलटीचें औषध घेतलें पाहिजे. |
| 26 Very well, I shall be very happy to take any thing you order. | फार चांगलें, तुह्मी सांगाल तें घेण्यास मी खुषी आहें. |
| 27 Dissolve this powder in a cup full of cold water; and drink one-half of it now, and the other half fifteen minutes afterwards, if it does not make you vomit. | थंड पाणी एक पेलाभर घेऊन त्यांत ही पूड घालून अर्धें आतां घ्या आणि पावतासानें वांति झाली नाहीं तर बाकीचेंही पिऊन टाका. |
| 28 As soon as you get sick drink two or three cupfulls of luke-warm water to promote vomiting. | पोटांत ढवळूं लागलें ह्मणजे वांति चांगली होण्यासाटीं दोन तीन पेले कोमट पाणी प्या. |
| 29 Did you understand what I said to you? | मीं तुह्मांस सांगितलें तें तुह्मीं समजलां ना ? |
| 30 Yes. What must I eat? | होय समजलों. पण मी काय खाऊं ? |
| 31 You must eat nothing but conjee to-day. | आज पेजेवांचून दुसरें कांहीं खाऊं नका |
| 32 Do not cover yourself with too many clothes, but keep yourself as cool as you can. | पुष्कळ चिरगुटें पांघरूं नका, परंतु तुमच्यानें आंग जितकें थंड राखवेल तितकें राखा. |
| 33 I shall see you again in the evening. | संध्याकाळीं मी तुह्मांस पाहावयास पुन्हा येईन. |

| | |
|---|---|
| 34 I am very much obliged to you for your kindness. | तुमची कृपा मजवर आहे, ह्या करितां मी तुमचा फार आभारी आहें. |
| 35 How do you feel now? | आतां तुह्मांस कसें वाटतें ? |
| 36 I feel a little better since morning. | सकाळपासून मला कांहींसें बरें वाटतें. |
| 37 How often did the medicine make you vomit? | त्या औषधापासून तुह्मांस किती वेळ वांति झाली ? |
| 38 Four times very copiously. | चार वेळ चांगली सडकून झाली. |
| 39 Has it purged you? | त्यानें कांहीं रेच झाला काय ? |
| 40 No. | नाहीं. |
| 41 Have you any headache or giddiness now? | आतां तुमचें डोकें दुखतें किंवा भोंवळ येते काय ? |
| 42 I have a little headache but no giddiness. | माझें थोडेंसें डोकें दुखतें, पण भोंवळ येत नाहीं. |
| 43 Send a man to my Bangalow with a cup for medicine. | औषध आणण्यासाठीं पेला देऊन एक माणूस माझे बंगल्यांत पाठवा. |
| 44 Give the patient these two pills at bed time, and the draught to-morrow morning at daylight; and tell him also to put his feet in hot water for half an hour before going to bed. | दुखणेकऱ्यास रात्रीं निजतांना ह्या दोन गोळ्या द्या, आणि हें औषध सकाळीं पाजा, आणि निजण्यापूर्वीं अर्धतासपर्यंत गरम पाण्यांत त्याला आपले पाय ठेव, ह्मणून सांगा. |
| 45 What is the matter with you? | तुह्मांस काय रोग आहे ? |
| 46 I have severe bowel complaint, attended with a good deal of griping and straining and a great deal of rumbling in my bowels. | मला वारंवार शौचास होतें, मुरडा करतो, व कुंथावें लागतें, आणि पोटांत पुष्कळ गुरगुरतें. |
| 47 Is the pain in your bowels constant, or does it come on occasionally? | तुमच्या पोटांत एकसारखें दुखतें किंवा केव्हां केव्हां दुखतें ? |
| 48 It comes on occasionally, and is principally felt before going to stool. | केव्हां केव्हां दुखतें आणि मुख्यत्वेंकरून शौचास होण्यापूर्वीं. |

| | |
|---|---|
| 49 What appearance have your stools? | तुमच्या मळाचें रूप कसें असतें ? |
| 50 They consist principally of slime, mixed with a little blood. | त्यांत विशेषेंकरून आंव आणि कांहीं रक्त हीं मिश्रित असतात. |
| 51 Are they copious, or scanty? | मळ फार होतो, किंवा थोडा होतो ? |
| 52 Very scanty. | फार थोडा. |
| 53 How were you first taken ill? | हें दुखणें तुह्मांस प्रथम कसें लागलें ? |
| 54 I was about ten days ago suddenly seized with severe chills and shivering which continued for about two hours; my skin then became very hot, I felt very thirsty, and had a severe headache which was followed by copious perspiration. | सुमारें दहा दिवसांपूर्वीं मला एकाएकीं फार थंडी वाजून हुडहुडी भरली, ती सुमारें दोन तासपर्यंत राहिली; त्यानंतर आंग कढत झालें, तृषा फार लागली, व डोकें फार दुखूं लागलें, नंतर घाम पुष्कळ आला. |
| 55 At what intervals does the fever come on? | ताप किती दिवसांनीं येतो ? |
| 56 At first it came on every two days, but now it returns every day. | पहिल्यानें दोन दिवसांनीं येत होता, आतां दररोज येतो ? |
| 57 How long does the fever generally last. | ताप किती वेळपर्यंत राहतो ? |
| 58 Nearly three hours. | सुमारें तीन तास. |
| 59 What is the matter with you? | तुह्मांस काय होतें ? |
| 60 I have a sharp pain in my right side, sometimes shooting up to the right shoulder, increased by pressure, and by taking a deep inspiration. | माझ्या उजव्या कुशींत फार दुखतें आणि कधीं कधीं ती तिडीक उजव्या खांद्यांत चढते, आणि दाबल्यानें व श्वास घेतल्यानें अधिक होते. |
| 61 Put your hand on the spot where it pains you. | ज्या जागीं तुमचें दुखतें तेथें हात ठेवा. |
| 62 Take two of these pills every night, and one every morning. | ह्यांतून दोन गोळ्या दर रोज रात्रीं घ्या आणि एक सकाळीं घ्या. |
| 63 He caught the fever by exposing himself to the sun all day. | दिवसभर ऊन्ह घेतल्यामुळें त्याला ताप आला. |

| | |
|---|---|
| 64 This disorder is at present very prevalent. | ह्या रोगाची आतां फार प्रवृत्ति आहे. |
| 65 Temperance is conducive to health. | मिताहार प्रकृतीस सुखावह आहे. |
| 66 Heat a knife and apply it to the part, and then the bleeding will stop. | सुरी तापवून त्या जाग्यावर लाव, ह्मणजे तेथून रक्त वाहण्याचें बंद होईल. |
| 67 You were ill, certainly, but could you not have sent some one to tell me ? | तुह्मीं अजारी होतां खरें, तरी मला कळविण्याकरितां तुमच्यानें एखादे माणसास पाठववलें नाहीं काय ? |
| 68 That man has been bitten by a mad dog, and if his leg be not cut off immediately he will die. | पिसाळलेला कुत्रा त्या माणसास डसला आहे, ह्मणून जर त्याचा पाय लवकर कापून टाकिला नाहीं, तर तो मरेल. |
| 69 If the boy had not gone out at mid-day, the sun would not have affected him. | तो मुलगा दुपारीं बाहेर गेला नसता तर त्यास उन्हाचे योगानें कांहीं झालें नसतें. |
| 70 He told me that he was attacked with cholera. | त्यानें मला सांगितलें कीं, माझा वाखा झाला होता. |
| 71 Have you any pain in your head ? | तुमचें डोकें दुखतें काय ? |
| 72 In what part is the pain ? | कोणते ठिकाणीं दुखतें ? |
| 73 Is it constant or occasional ? | नेहमीं दुखतें किंवा कधींमधीं ? |
| 74 Is it a dull aching pain or a sharp shooting one ? | मंद मंद दुखतें किंवा तीव्र वेदना होतात ? |
| 75 Do you feel your eyes heavy? | तुमचे डोळे तुह्मांस जड झालेसे वाटतात काय ? |
| 76 When did you have fever last ? | अलीकडे तुह्मांस ताप कधीं आला होता ? |
| 77 Have you had any fever to-day ? | तुह्मांस आज ताप आला होता काय? |
| 78 Was the last attack milder than the former one ? | पूर्वीच्या पेक्षां अलीकडचा ताप कांहीं कमी होता काय ? |

| | |
|---|---|
| 79 How long did the cold fit last ? | थंडी किती वेळपर्यंत राहिली ? |
| 80 Were you very hot after the shivering ? | हुडहुडी भरल्यावर तुमचे आंगाची फार तलखी झाली काय? |
| 81 Did you perspire much after the hot stage ? | ताप उतरल्यावर तुह्मांस फार घाम आला काय? |
| 82 Is your urine high coloured ? | तुमची लघ्वी लालभडक होती काय? |
| 83 Does it feel hot whilst passing ? | लघ्वी होते वेळेस कढत होते काय? |
| 84 What quantity do you pass at a time ? | दर वेळेस किती होते? |
| 85 Is it increasing or diminishing ? | अधिक होते किंवा कमी होते? |
| 86 Have you any pain in your side, breast, bowels, back, or limbs ? | तुमच्या कुशींत, छातींत, पोटांत पाटींत किंवा दुसरे ठिकाणीं दुखतें काय? |
| 87 Do you feel thirsty ? | तुह्मांस शोष लागतो काय? |
| 88 Do you feel puffed in the stomach after eating ? | खाल्ल्यावर तुमचें पोट फुगतें काय? |
| 89 Have you vomited freely ? | तुह्मांस उलटी सडकून झाली काय? |
| 90 Is there any pain in any part of your bowels ? | तुमच्या पोटांत कोठें तरी दुखतें काय? |
| 91 Can you bear the pressure of my hand on every part without pain ? | माझ्या हाताचा दाब तुमच्या पोटावर कोठेंही घातला असतां दुःख न होतां तुह्मांस सोसवतो काय? |
| 92 Do you feel pain in your bowels when you go to stool ? | तुह्मी शौचास बसतां तेव्हां पोटांत कांहीं दुखतें काय? |
| 93 Have you any straining at stool ? | शौचाचे वेळेस तुह्मांस कुंथावें लागतें काय? |
| 94 Do you pass any slime or blood ? | तुह्मांस कांहीं आंव किंवा रक्त पडतें काय? |
| 95 How often do you take the mixture ? | दररोज तुह्मीं किती वेळां हें मिश्रित औषध घेतां? |

| | |
|---|---|
| 96 When did you take it last? | औषध केव्हां घेतलें होतें? |
| 97 How much do you take at a time? | दर वेळेस किती औषध घेतां? |
| 98 Have the pills operated freely? | गोळ्यांनीं साफ जुलाब झाला काय? |
| 99 Did you take caster oil in the morning after the pills? | गोळ्या घेतल्यावर सकाळीं एरंडेल घेतलें होतें काय? |
| 100 How is your cough to-day? | आज तुमचा खोकला कसा आहे? |
| 101 Have you any pain when you cough? | खोकते वेळेस कोठें दुखतें काय? |
| 102 Do you spit much when you cough? | खोकते वेळेस कफ पुष्कळ पडतो काय? |
| 103 Is there any blood mixed with the sputa? | कफावरोबर कांहीं रक्त पडतें काय? |
| 104 Can you breathe without pain? | कांहीं दुखल्यावांचून तुह्मांस श्वासोच्छ्वास करतां येतो काय? |
| 105 Does the pain increase when you draw your breath in? | श्वास घेते वेळेस जास्ती दुखतें काय? |
| 106 How long have you had this cough? | हा खोकला लागून किती दिवस झाले? |
| 107 Is not the cough worse when you lie down? | निजलें असतां तुह्मांस जास्ती खोकला होत नाहीं काय? |
| 108 Can you lie on the right or left side with ease? | तुह्मांस उजव्या बाजूवर निजल्यानें चैन पडतें किंवा डाव्या बाजूवर? |
| 109 Do you find any relief from the medicine? | ह्या औषधापासून तुह्मांस कांहीं आराम होतो काय? |
| 110 Have you any pain between your shoulders? | तुमच्या खांद्यांच्या मध्यें कांहीं दुखतें काय? |
| 111 Did you feel easier after the bleeding? | शीर काढल्यावर तुह्मांस कांहीं बरें वाटलें काय? |
| 112 Have you any pain in your shoulder joint? | तुमच्या खांद्यांचे सांध्यांत कांहीं दुखतें काय? |
| 113 Is it swollen? | तो सुजला आहे काय? |

| | |
|---|---|
| 114 Have you ever suffered from rheumatism? | तुह्मांस कधीं आमवायु झाला होता काय ? |
| 115 Have you pain in your knee-joint? | तुमच्या गुडघ्याच्या सांध्यांत दुखतें काय ? |
| 116 Have you pain in your toes and fingers? | तुमच्या हातांपायांचीं बोटें दुखतात काय ? |
| 117 Have you pain in your ankle joint? | तुमच्या घोट्यांत दुखतें काय ? |
| 118 Have you pain in your elbow-joint? | तुमच्या कोपराच्या सांध्यांत दुखतें काय ? |
| 119 Have you pain in your loins? | तुमच्या कमरेंत दुखतें काय ? |
| 120 Does the pain increase towards night? | रात्र होऊं लागली ह्मणजे अधिक दुखतें काय ? |
| 121 Does the medicine you take purge or gripe you? | जें औषधं तुह्मी घेतां त्यानें जुलाब किंवा मुरडा होतो काय ? |
| 122 Does your skin feel dry, or moist? | तुमची कातडी कोरडी लागते किंवा ओलसर लागते ? |
| 123 Does your heart beat much? | तुमचा ऊर फार उडतो काय ? |
| 124 Have you ever suffered from disease of the liver? | तुह्मांस कधीं यकृत् रोग झाला होता काय ? |
| 125 The white of your eye is more yellow than usual. | तुमच्या डोळ्याची कवडी नेहमींपेक्षां जास्ती पिंवळी दिसते. |
| 126 Are your gums sore? | तुमच्या हिरड्या दुखतात काय ? |
| 127 Have you applied the blister to your chest? | तुह्मीं आपल्या उरावर पलास्तर मारलें आहे काय ? |
| 128 Has it risen well? | पलास्तर चांगलें उठलें आहे काय ? |
| 129 Has the discharge been copious? | तें फार वाहिलें काय ? |
| 130 How did that man meet with the accident to his leg? | त्या मनुष्याचा पाय कशानें दुखावला? |
| 131 In what way did he fall? | तो कसा पडला ? |

| | |
|---|---|
| 132 Is his leg broken? | त्याचा पाय मोडला काय ? |
| 133 Bring bandages and splints. | पट्टे आणि भाळ्या आण. |
| 134 Is he senseless? | तो बेशुद्ध आहे काय ? |
| 135 Let his head be shaved, and cold lotions constantly applied to it. | त्याच्या डोक्याचे केस काढून त्याला थंड औषधीपाणी नेहमीं लावीत जा. |
| 136 Has he broken his arm? | त्याचा हात मोडला आहे काय ? |
| 137 How did this happen to you? | हें तुह्मांस कसें झालें ? |
| 138 Have you toothache? | तुमचे दांताला कळ लागली आहे काय ? |
| 139 Shall I exract your tooth? | मी तुमचा दांत उपटून काढूं ? |
| 140 It is very much decayed, I see. | मला दिसतें कीं, तो फार सडून गेला आहे. |
| 141 Your tongue is much coated. | तुमच्या जिभेवर मळ फार आला आहे. |
| 142 You must take some opening medicine. | तुह्मांस कांहीं जुलाब (शोधन) घेतला पाहिजे. |
| 143 How long has that sore been on your skin? | तुमच्या आंगावर हा व्रण होऊन किती दिवस झाले ? |
| 144 Have you tried any remedies to heal it? | तुह्मी तो बरा होण्याचा कांहीं उपाय करून पाहिला काय ? |
| 145 Do you feel very weak? | तुह्मांला फार अशक्तता वाटते काय ? |
| 146 Have you any pain in the thigh? | तुमच्या मांडींत दुखतें काय ? |
| 147 Let two dozen leeches be applied on the place I mark. | मी खूण करितों, त्या जाग्यावर दोन डजन (चोवीस) जळवा लावा. |
| 148 Take sixteen ounces of blood from that man. | त्या मनुष्याचे आंगांतून सोळा औंस रक्त काढा. |
| 149 Do you feel faint? | तुह्मांला मूर्छा येते काय ? |
| 150 Were you ever bled before? | पूर्वीं कधीं तुमची शीर काढली होती काय ? |

| | |
|---|---|
| 151 Has this child ever been vaccinated? | ह्या मुलास देवी (शिक्के) काढल्या होत्या काय ? |
| 152 How old is it? | हें किती वर्षांचें आहे ? |
| 153 Is it a boy or a girl? | हा मुलगा आहे किंवा मुलगी ? |
| 154 Have you applied the mustard poultice to the calves of his legs? | त्याच्या पायांचे पोट्र्यांवर मोहऱ्यांचा लेप लावला होता काय ? |
| 155 What diet do you generally take? | तुह्मी पथ्य काय करितां ? |
| 156 Is the part which I touch very sore? | जेथें मी हात लावला आहे ती जागा फार दुखते काय ? |
| 157 Put my hand on the part that pains. | जेथें तुमचें दुखतें तेथें माझा हात ठेवा. |
| 158 You must keep yourself well covered with the bed clothes. | तुह्मी पांघरूण चांगलें गुरगुटून घ्या. |
| 159 You must not remain in that current of air. | तुह्मी ह्या वाऱ्याच्या झोतांत बसूं नये. |
| 160 You must not wet your feet. | तुह्मीं आपले पाय भिजवूं नयेत. |
| 161 When you are thirsty, you should drink conjee. | तुह्मांस ताहान लागेल तेव्हां पेज पीत जा. |
| 162 If you do not gain strength in a few days, come into the hospital again. | तुह्मांस थोडे दिवसांत शक्ति आली नाहीं तर फिरून इसपितळांत या. |
| 163 Give that man some cholera mixture. | त्याला कांहीं थोडेंसें कालरा मिक्श्चर द्या. |
| 164 How long have you had vomiting and purging? | केव्हांपासून तुह्मांस उलटी आणि झाडा होत आहे ? |
| 165 He appears to be sinking fast? | तो लवकर मरेल असें दिसतें. |
| 166 Have you severe cramps? | तुमचे हातांपायांला वळ (पेटके) फार येतात काय ? |

| | |
|---|---|
| 167 Did you ever have cholera before? | तुह्मांस कधीं तरी वाखा ( कालरा ) झाला होता काय ? |
| 168 Give him forty drops of laudanum instantly. | त्याला झटकन अफूचे अर्काचे चाळीस थेंब द्या. |
| 169 Is that man dying? | तो माणूस मरतो काय ? |
| 170 This man is recovering, I think. | हा मनुष्य बरा होण्याचे पंथास लागला आहे असें मला वाटतें. |
| 171 Do you feel stronger? | तुह्मांला शक्ति येत चालली आहेशी वाटते काय ? |
| 172 You must be careful of what you eat. | खाण्यापिण्याविषयीं तुह्मांस जपलें पाहिजे. |
| 173 Do you feel pain in the muscles of the back? | तुमच्या पाठीचे स्नायु दुखतात काय? |
| 174 Does not the artery in your right wrist beat very violently? | तुमच्या उजव्या हाताची नाड चांगली जोरानें उडत नाहीं काय ? |
| 175 The blood in the veins on your right hand appears very black. | तुमच्या उजव्या हाताच्या शिरांतील रक्त फार काळें दिसतें. |
| 176 Have you pain in the nerves of your face? | तुमच्या तोंडावरील नसा दुखतात काय ? |
| 177 Are the glands in that child's neck enlarged? | त्या मुलाचे मानेवर गंडमाळा उठल्या आहेत काय ? |
| 178 That tumour ought to be cut out. | तें अवाळूं कापून टाकिलें पाहिजे. |
| 179 The ligaments of the foot appear to be injured. | पायाचें संधिबंधन दुखावलेंसें वाटतें. |
| 180 Does your nose feel to be stopped up? | तुमचें नाक चोंदलें आहे काय ? |
| 181 There is a good deal of running from it. | नाकांतून पाणी फार येत आहे. |
| 182 You appear to have caught a violent cold. | तुह्मांस फार पडसें आलें आहेसें दिसतें. |

| | |
|---|---|
| 183 You must put your feet in warm water to-night at bed time. | आज रात्रीस निजते वेळेस तुह्मी गरम पाण्यांत पाय ठेवा. |
| 184 You must not eat fruit or vegetables. | तुह्मीं फळफळावळ किंवा भाजी खाऊं नये. |
| 185 Are your eyes painful? | तुमचे डोळे दुखतात काय ? |
| 186 Do you sleep well at night? | रात्रीं झोप चांगली लागते काय ? |
| 187 Have you injured your ribs? | तुमच्या बरगड्या दुखावल्या आहेत काय ? |
| 188 Have you broken your collar bone? | तुमच्या गळ्याची सरी ( जत्रु ) मोडली आहे काय ? |
| 189 Did you receive a blow on your breast bone? | तुमच्या उराचे हाडावर ठोसा लागला आहे काय ? |
| 190 Your spine is crooked. | तुमच्या पाठीचा कणा वांकडा आहे. |
| 191 Have you much pain in your ear? | तुमचा कान फार दुखतो काय ? |
| 192 Is there much wax in it? | त्यांत मळ फार झाला आहे काय ? |
| 193 Are you salivated? | तुह्मांस तोंड येण्याचें औषध दिलें आहे काय ? |
| 194 How long has your mouth been sore? | केव्हांपासून तुमचें तोंड आलें आहे ? |
| 195 Are you deaf? | तुह्मी बहिरे आहां ? |
| 196 Can you see well at night? | रात्रीं तुह्मांस चांगलें दिसतें काय ? |
| 197 Is the sight of the eye improving? | तुमची दृष्टि सुधारत चालली आहे काय ? |
| 198 Are you quite blind with that eye? | काय, तुह्मांस त्या डोळ्यानें अगदीं दिसत नाहीं ? |
| 199 Have you had an operation performed on it? | त्यावर कांहीं शस्त्रोपाय केला होता काय ? |
| 200 Are you frightened that you tremble so much? | तुह्मी भ्यालां आहां काय, इतके कांपतां ते ? |
| 201 Have you any heart-burn? | तुमचे उरांत कांहीं जळतें काय ? |

| | |
|---|---|
| 202 Do you feel pain under the ribs of the right side ? | तुमच्या उजव्या कुशीचे फांसळीखालीं कांहीं दुखतें काय ? |
| 203 You must take mercury. | तुह्मांस पारा घेतला पाहिजे. |
| 204 Do you ever find in your stool hard lumps like pieces of fat? | तुह्मांस शौचाचे वेळीं मलद्वारानें कठीण गोळे, चरबीचे तुकड्याप्रमाणें पडतात काय ? |
| 205 Have you passed any worms? | तुह्मांस जंत पडले होते काय ? |
| 206 Of what kind were they, long and round like earth worms, or broad like a piece of tape ? | ते कोणत्या प्रकारचे होते, लांब व वाटोळे गांडवळासारखे, किंवा चपटे फितेच्या तुकड्या सारखे ? |
| 207 Were they small and white like little pieces of thread? | ते लहान आणि पांढरे तंतूसारखे होते काय ? |
| 208 You must keep very quiet. | तुह्मीं अगदीं स्वस्थ असावें. |

# MISCELLANEOUS PHRASES.

| ENGLISH. | मराठी. |
|---|---|
| 1 I think it is hardly possible to convey the meaning of this sentence properly in Hindustani, so that Natives may understand it. | एतद्देशीय लोकांस समजण्याजोगा ह्या वाक्याचा बराबर अर्थ हिंदुस्थानी भाषेत आणणें अशक्य आहे, असें मला वाटतें. |
| 2 This business has been entrusted to you; if it should be spoiled, you must be answerable. | हें काम तुह्मांवर सोंपलें आहे, जर बिघडलें तर त्याचा जवाब तुह्मांस द्यावा लागेल. |
| 3 He stole my knife during my absence. | माझ्या मागें त्यानें माझा चाकू चोरिला. |
| 4 I am not a child, that I should mind your threat. | मी पोर नाहीं कीं, तुमची धमकी ऐकेन. |
| 5 If the purse should be found, inform me of it. | थैली सांपडली तर मला कळीव. |
| 6 If he had asked, I would have given it. | त्यानें मागितलें असतें, तर मीं दिलें असतें. |
| 7 It would have been better, if he had killed me. | त्यानें मला ठार मारिलें असतें, तर बरें झालें असतें. |
| 8 Last night his house caught fire. | त्याच्या घराला काल रात्रीं आग लागली |
| 9 He is the man who set your house on fire. | ज्यानें तुझ्या घराला आग लावली, तो हाच मनुष्य. |
| 10 He is not one of my acquaintance, I have merely heard of him. | त्याची माझी ओळख नाहीं, मी त्याचें नांव मात्र ऐकिलें आहे. |
| 11 He comes to see me every day towards evening. | तो दररोज संध्याकाळचे सुमारास मला भेटायास येतो. |

| | |
|---|---|
| 12 I was laid up with a fever, and therefore was not able to attend upon you. | मी तापानें पडलों होतों, ह्मणून आपलेकडे माझ्यानें येववलें नाहीं. |
| 13 When he fell from his horse was he hurt any where? | तो घोडयावरून पडला तेव्हां त्याला कोठें कांहीं दुखापत झाली काय? |
| 14 I have not seen him these five years. | पांच वर्षें झालीं, मी त्यास पाहिलें नाहीं. |
| 15 What did you say to him when he brought my message to you? | जेव्हां तो माझा निरोप तुमचे कडे घेऊन आला तेव्हां तुह्मी त्याला काय बोललां? |
| 16 He bears an excellent character in Bombay. | मुंबईंत त्याची आबरू फार आहे. |
| 17 I am in a hurry, let me go soon. | मला जाण्याची घाई आहे, लवकर जाऊं दे. |
| 18 I should like to collect a few curiosities in this country to send to England. | ह्या देशांतील कांहीं चमत्कारिक वस्तु विलायतेस पाठविण्यासाटीं जमा कराव्या, अशी माझी इच्छा आहे. |
| 19 Come to see me on your way home. | घरीं जातांना माझे भेटीकरितां या. |
| 20 Do not force me to commit this wicked act. | हें वाईट काम मजकडून करवूं नको. |
| 21 He is a man of his word. | तो वचनाचा धड आहे. |
| 22 It is too late now, I will postpone the matter till Monday morning. | आतां उशीर झाला आहे ह्मणून मी हें काम सोमवारावर ठेवितों. |
| 23 He is easy of belief. | तो कानाचा हलका आहे. |
| 24 I am so poor that I cannot give you a thousand Pice much less a thousand Rupees. | मी इतका गरीव आहें कीं, माझ्यानें हजार पैसेही देववत नाहींत, मग तुला हजार रुपये कोठून देऊं. |
| 25 Together with his pay and other perquisites he makes three thousand Rupees a month. | पगार आणि शिवाय मिळकत मिळून त्याला दर महिना तीन हजार रुपये मिळतात. |

| | |
|---|---|
| 26 Whilst passing on horse back through a narrow crooked lane, I overtook a woman walking in the same direction, and by accident I knocked her down. | मी घोड्यावर बसून एके आडवळणी लहान गल्लींतून जात असतां त्याच मार्गानें एक स्त्री जात होती, तिजजवळ आलों आणि तिला अवचित धक्का लागून ती पडली. |
| 27 Ought he or ought he not to have called upon such an one before he called upon you. | तुमची भेट घेण्यापूर्वीं फलाण्याची भेट घेणें, हें त्यास योग्य होतें किंवा नव्हतें. |
| 28 Since leaving Bombay, how long have you been at Tanna? | मुंबई सोडल्यापासून आपण ठाण्यास किती दिवस आहां? |
| 29 What is the nature of your duties in your master's service? | तुह्मी आपल्या धन्याच्या कोणत्या कामावर आहां? |
| 30 I believe you are an unfortunate man. | मला वाटतें कीं, तूं दैवहीन आहेस. |
| 31 This book is now nearly finished. | हें पुस्तक आतां संपविण्याचे लागांत आणलें आहे. |
| 32 I would not wish for the whole world that he heard of my illness, as it would make him very uneasy. | देव करो कीं, त्याला माझ्या दुखण्याचें वर्तमान न कळो, कळलें तर त्याला फार काळजी लागेल. |
| 33 I heard that he arrived yesterday, but I now find that I was misinformed. | तो काल आला असें ऐकिलें होतें, परंतु आतां मला समजलें कीं, तें खोटें वर्तमान आहे. |
| 34 The rehearsal of so long a story would occupy two hours. | अशी लांबलचक गोष्ट सांगण्यास दोन तास पाहिजेत. |
| 35 Do you think he would have done so, had I been present? | तुह्मांस वाटतें कीं, मी असतों तर असें काम त्यानें केलें असतें? |
| 36 Were there as many people present as you expected? | तुमचे मनांत होतीं तितकीं माणसें तेथें होतीं काय? |
| 37 He went away in a great rage, and probably threw himself into the sea. | तो मोठ्या क्रोधानें निघून गेला आणि बहुधा त्यानें समुद्रांत घालून घेतलें असेल. |

| | |
|---|---|
| 38 If you do not pay the money, he will not let you alone. | तुह्मी तो पैसा न द्याल, तर तो तुमची पाठ सोडणार नाहीं. |
| 39 If you neglect your duty, you will have every one of them about your ears. | जर तुह्मी आपल्या कामाची हयगय कराल तर ते सर्व तुमचे बोकांडीस बसतील. |
| 40 I give you a fair warning; therefore do not expect any more consideration from me. | मी तुह्मांस साफ ताकीद करतों, ह्मणून पुढें तुह्मी माझे दयेच्या भरंवशावर राहूं नका. |
| 41 I see no use in being thus particular in trifles. | क्षुल्लक गोष्टींत असे चौकशीनें चालण्याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं. |
| 42 He is a regular skin-flint. | तो अगदीं कवडीचुंबक आहे. |
| 43 I wish I could impress my advice better upon his mind. | मी असें इच्छितों कीं, माझा उपदेश त्याचे मनांत अधिक चांगला ठसता तर बरें होतें. |
| 44 He remains at home doing nothing. | तो घरीं रिकामा बसतो. |
| 45 The tree is continually growing, because the gardner to promote its growth, waters it every day. | हें झाड वाढत चाललें आहे, कारण वाढावें ह्मणून माळी त्याला नेहमीं पाणी घालीत असतो. |
| 46 That man has run away; perhaps you caused him to run away. | तो माणूस पळून गेला, मला वाटतें कीं, तुह्मींच त्याला पळविलें असावें. |
| 47 He is so clever, there is none like him. | तो अति चतुर आहे, त्यासारखा दुसरा कोणी नाहींच. |
| 48 I am doing this to make him more jealous; because he is very jealous of me. | तो मला देखूं सकत नाहीं ह्मणूनच त्याला अधिक हेवा यावा ह्यासाठीं मी हें करतों. |
| 49 At first he would not do this business; but I forced him to do it. | पहिल्यानें तो हें काम करीना; परंतु मीं जुलमानें करविलें. |

| | |
|---|---|
| 50 I tried much to persuade him, but he disregarded what I said; therefore I forbade him my house. | मीं त्याला पुष्कळ समजाविलें; परंतु त्यानें माझी गोष्ट मनास आणली नाहीं, ह्मणून मीं त्याला माझे घरीं येण्याचें बंद केलें. |
| 51 Can you drive? does that horse go quietly in harness? | तुह्मांस गाडी हांकतां येते काय ? तो घोडा गाडीला मुकाट्यानें चालतो ? |
| 52 Being convicted of peculation, he was dismissed the service, and transported for seven years. | त्याजवर तनाखोरीचा गुन्हा शाबीत झाला ह्मणून त्यास चाकरींतून बरतर्फ केलें, आणि सात वर्षेपर्यंत काळ्या पाण्यावर जाण्याची सजा झाली. |
| 53 They all thought that he was drowning, but he was only diving. | सर्वांस असें वाटलें कीं, तो बुडत आहे, परंतु तो बुड्या मारीत होता. |
| 54 The water here is shallow, but further on, it is very deep. | येथें पाणी उथळ आहे, परंतु पुढें फारच खोल आहे. |
| 55 He is generally grave and sedate, but his brother is very lively. | तो फार करून गंभीर व विचारशील असतो, परंतु त्याचा भाऊ रंगेली आहे. |
| 56 Had any one reminded me of you I should have recollected. | तुजविषयीं जर मला कोणी आठवण दिली असती तर मला स्मरण झालें असतें. |
| 57 The banks of the river are very steep, but they do not rise to any great height. | नदीचे कांठ मोठे खर आहेत, परंतु फार उंच नाहींत. |
| 58 You can more easily ford the river, than go in the boat. | होडींत बसून जाण्यापेक्षां पायानें नदी उतरून सहज जाल. |
| 59 He did not return from his native country till the latter end of June. | जून महिन्याचे अखेरीपर्यंत तो स्वदेशाहून परत आला नव्हता. |
| 60 It is of no use for you to stand here, crying and making a noise. | तुमचें येथें उभेराहून रडणें व गोंगाट करणें व्यर्थ आहे. |

| | |
|---|---|
| 61 This child was weaned when he was a year and a half old. | हें मूल दीड वर्षाचें झालें, तेव्हांपासून त्याचें दूध तोडलें आहे. |
| 62 He would go through thick and thin for you. | कोणता कसाही प्रसंग आला असतां तुझ्यासाठीं तो आपणावर घेईल. |
| 63 It is twenty to one that he arrives to-night. | तो फार करून आज रात्रीं येऊन पोंहचेल. |
| 64 Now-a-days is such an one's levee much crowded or thinly attended? | हल्लीं फलाण्याचे दरबारांत पुष्कळ लोक जमतात किंवा थोडे ? |
| 65 We all are liable to death. | सर्वांस मरण आहेच. |
| 66 There is something in the wind. | पुढें कांहीं तरी होणार आहे असें वाटतें. |
| 67 Cut your stick. | ताटी काप (पळून जा.) |
| 68 Last night there was a great deal of thunder and lightning, but no rain. | काल रात्रीस विजा पुष्कळ चमकल्या व गडगडाट झाला, परंतु पाऊस पडला नाहीं. |
| 69 Yesterday evening there was a rain-bow. | काल संध्याकाळीं इंद्रधनुष्य पडलें होतें. |
| 70 That Island was destroyed by a storm and an earthquake. | तुफानानें आणि धरणीकंपानें त्या बेटाचा नाश झाला. |
| 71 If a man bets he will walk six miles an hour, he must walk a mile in every ten minutes. | जर कोणी पैज मारील कीं, मी एक तासांत सहा मैल चालेन, तर त्याला दहा दहा मिन्युटांत एक मैल चाललें पाहिजे. |
| 72 You say you would give it to me if you could; but you would have been nearer the truth, had you said that you could give it, if you would. | तुह्मी सांगतां कीं, जर मी देऊं शकतों, तर देतों, ह्यापेक्षां जर देण्यास इच्छितों तर देतों असें ह्मणतां तर खरेपणा विशेष असता. |
| 73 Have you done looking at me? | तुह्मीं मला पोटभर पाहिलें काय ? |
| 74 The prisoner escaped by the connivance of the watchman. | चौकीदाराच्या कानडोळ्यामुळें कैदी पळून गेला. |

| | |
|---|---|
| 75 He says it is hollow; but I maintain that the whole is solid. | तो ह्मणतो कीं, पोकळ आहे, परंतु माझ्या मतें तें सर्व भरीव आहे. |
| 76 Where was the capital of Guzerat at the time of the Mogul Government? | मोंगल लोकांचे राजाचे वेळीं गुजराथची राजधानी कोठें होती ? |
| 77 Does the climate of Bombay agree with you? | तुह्मांस मुंबईची हवा मानते काय ? |
| 78 If a wall falls and a tenant is living in the house; who then repairs it, the landlord or the tenant? | कोणी भाडेकरी ज्या घरांत राहत आहे त्या घराची भिंत पडली तर तिची डागडुजी कोण करितो, घरधनी किंवा भाडेकरी ? |
| 79 Generally speaking, the people of this country are litigious. | बहुतकरून ह्या देशाचे लोक वादप्रिय आहेत. |
| 80 If you had done as I directed you; I would have secured myself; nay I should have been a gainer by the speculation; but by your mismanagement, I became a loser. | जर तुह्मी माझ्या सांगण्याप्रमाणें केलें असतें, तर मी बचावलों असतों इतकेंच केवळ नाहीं, तर ह्या सट्टयापासून मला लाभ झाला असता, परंतु तुमच्या गैरकारभारामुळें मला तोटा आला. |
| 81 Does that man owe you anything? | त्या मनुष्याकडे तुमचें कांहीं येणें आहे? |
| 82 I owe him ten Rupees. | त्या मनुष्याचें मी दहा रुपये देणें आहे. |
| 83 My servant owes a great deal of money to the Bazaar people. | बाजारचे लोकांचें पुष्कळ रुपये माझे चाकराला देणें आहे. |
| 84 He dunned him very much; but he could not get the money. | त्यानें फार तगादा केला, परंतु पैसा हातीं लागला नाहीं. |
| 85 You are a dunning fellow. | तूं तगादेदार ( धरणेकरी ) आहेस. |
| 86 It is of no consequence. | त्याची कांहीं चिंता नाहीं. |
| 87 Seeing him in this distress, we raised a subscription among ourselves, and gave him the amount. | जेव्हां आह्मीं तो अशा संकटांत पडलेला पाहिला, तेव्हां आपापल्यांत वर्गणी करून तो पैसा त्याला दिला. |

| | | |
|---|---|---|
| 88 | Bring me from the Bazaar a Pice worth of oil, two Pice worth of wood, and three Pice worth of flour. | बाजारांत जाऊन मजकरितां एक पैशाचें तेल, दोन पैशांचीं लांकडें, आणि तीन पैशांचें पीठ घेऊन ये. |
| 89 | I prefer telling him myself to your doing so. | तुह्मीं सांगावें त्यापेक्षां मी स्वतां सांगावें हें मला बरें वाटतें. |
| 90 | Where does this road lead to? | हा रस्ता कोणीकडे जातो? |
| 91 | Why do you always trouble me for these little matters? | अशा हलक्या गोष्टींविषयीं तुह्मी नेहमीं मला श्रम कां देतां? |
| 92 | How long were you on the road? | रस्त्यांत तुह्मांस किती दिवस मोडले? |
| 93 | By what route did you come? | तुह्मी कोणत्या रस्त्यानें आलां? |
| 94 | I came by Kaira, Broach and the Konkan. | मी खेडा, भडोच, आणि कोंकण ह्या वाटेनें आलों. |
| 95 | I saw him to-day; and told him to come to-morrow morning at 8 o'clock. | त्यास मी आज भेटलों, आणि सांगितलें कीं, तूं उद्यां सकाळीं आठ वाजतां ये. |
| 96 | I will take my lesson every other day. | एकांत्राड आपला धडा मी घेत जाईन. |
| 97 | Desire the man to come every day at sunrise. | दररोज सूर्योदयीं येण्याची त्यास वर्दी द्या. |
| 98 | At what hour does the morning dawn now? | आतांसें किती वाजतां उजाडतें बरें? |
| 99 | They bring a great deal of grass to Bombay from Salsette, and it sells very well. | साष्टीहून मुंबईस गवत पुष्कळ येतें आणि त्याचा भावही चांगला येतो. |
| 100 | Why is grass profitable to the farmers? | कुणबी लोकांस गवतापासून नफा फार कां होतो? |
| 101 | Because it requires no labour or expense in cultivation. | कारण त्यांस लागवडीचा खर्च अथवा श्रम कांहीं पडत नाहीं. |
| 102 | Last season there was abundance of rain; grain is therefore so cheap. | सालगुदस्तां पाऊस फार पडला ह्मणून धान्य इतकें स्वस्त आहे. |

| | |
|---|---|
| 103 How many people are waiting to speak to me? | मशीं बोलण्याकरितां किती आसामी थांबलेले आहेत ? |
| 104 Bring them in one by one. | एकएकास आंत घेऊन ये. |
| 105 He is a Dhobee, who has lost his cow, and as he thinks a neighbour took it to another village, he wants you to make enquiry. | तो परीट आहे, त्याची गाय हरवली आहे, आणि कोणी शेजारी तिला दुसरे गांवीं घेऊन गेला असेल, असें त्यास वाटतें ह्मणून तुह्मीं ह्या गोष्टीची चौकशी करावी, अशी त्याची विनंती आहे. |
| 106 Does the scarcity of water continue? | पाण्याचा हाकाटा अद्यापि आहेच काय ? |
| 107 No, the wells are beginning to fill fast; three or four days rain more will be sufficient for the present. | नाहीं, विहिरी भरत चालल्या आहेत, जर आणखी तीन चार दिवस पाऊस पडेल, तर सध्यां काम चालेल. |
| 108 What grain do they sow first? | पहिल्यानें कोणतें धान्य पेरितात ? |
| 109 What holiday is this? | आज कोणता सण आहे ? |
| 110 I cannot allow the people to go until mid-day. | माझ्यानें दोन प्रहरपर्यंत लोकांस घरीं जाण्याची रजा देववत नाहीं. |
| 111 Send my tent to such a village and have it pitched; I shall go there the day after to-morrow to see some land measured. | माझा तंबू अमुक गांवास पाठवून उभा करावा, तेथें कांहीं जमिनीची मोजणी होणार आहे ती पाहण्यासाटीं परवां मी तेथें जाणार आहें. |
| 112 There are a great many large stones on the road and several steep hills, and the nalla near Seroor is very difficult to pass. | त्या रस्त्यावर पुष्कळ धोंडी आहेत, आणि तिकडे कितीएक उभ्या खर (उभ्या चढावाच्या) टेंकड्या आहेत, आणि सिरोरा (घोडनदी) जवळचा जो नाला आहे, त्यावरून जाण्याला फारच कटीण पडतें. |
| 113 Is there a boat on the Koregaum river? | कोरेगांवच्या नदीला नाव आहे काय? |

| | | |
|---|---|---|
| 114 | Yes, a Government ferry boat; you will have to pay nothing. | होय सरकारी नाव आहे, तुह्मांस कांहीं द्यावें लागणार नाहीं. |
| 115 | Who told you that I had told him, what you told me last night? | जें कांहीं तुह्मीं मला काल रात्रीस सांगितलें होतें, तें मी त्याला सांगितलें, हें तुह्मांस कोणीं कळविलें? |
| 116 | He first asked ten Rupees for the book; but I brought him down to two. | प्रथम त्यानें ह्या पुस्तकाचे दहा रुपये मागितले, परंतु मी त्याला दोन रुपयांपर्यंत आणलें. |
| 117 | Do not tell him what I told you about his conduct. | मी त्याचे वर्त्तणुकेविषयीं जें कांहीं तुह्मांस सांगितलें होतें, तें त्यास कळवूं नका. |
| 118 | If you cannot give me this thing, give me something instead. | तुमच्यानें ही वस्तु देववत नसली, तर त्याच्या बदली दुसरी कांहीं द्या. |
| 119 | Although I cannot speak the Hindustani language well, yet the Natives understand me. | जरी मला हिंदुस्थानी चांगलें बोलतां येत नाहीं, तरी ह्या देशांतील लोक माझें बोलणें समजतात. |
| 120 | A bird in the hand is worth two in the bush. | गांठचा एक बाहेरचे शंभरांबरोबर आहे (हातचें सोडून पळत्याचे पाठीस लागूं नये.) |
| 121 | Wax will melt by fire. | मेण विस्तवानें वितळेल. |
| 122 | If you do not water this tree, it will die. | जर तुह्मीं ह्या झाडास पाणी घातलें नाहीं तर तें मरेल. |
| 123 | This flower is withered. | हें फूल कोमेजलें आहे. |
| 124 | Go to your house, eat your dinner and return quickly. | घरीं जाऊन जेवून लवकर परत या. |
| 125 | He has dissipated all his property. | त्यानें आपली सर्व मालमत्ता उधळून टाकिली. |
| 126 | When you have read this word once or twice, you will understand the meaning. | हा शब्द एक दोन वेळ तुमच्या वाचण्यांत आला ह्मणजे त्याचा अर्थ तुह्मांस समजेल. |

| | |
|---|---|
| 127 He is too familiar with his servants. | तो आपल्या चाकरलोकांशीं अगदीं खेळीमेळीनें वागतो. |
| 128 Get out of the light. | चल, अंधार सोड. |
| 129 This is my picture. | ही माझी तसबीर आहे. |
| 130 What! are all those Rupees I gave you spent? | काय! जे रुपये मी तुह्मांस दिले होते ते सर्व तुह्मीं खर्चून टाकिले? |
| 131 I went by Poona to Sattara. | मी पुण्यावरून साताऱ्यास गेलों. |
| 132 He disengaged him from the quarrel and led him away. | तो त्याला कज्जांतून सोडवून आपल्या बरोबर घेऊन गेला. |
| 133 Your servant pledged your sword and sash to him for fifteen Rupees. | तुमच्या चाकरानें तुमची तरवार व कंबरबंद पंधरा रुपयांस त्याजवळ गहाण टेविलीं. |
| 134 He was quite sensible after the first blow, but on receiving the second, he became senseless. | एक टोसा खाल्ल्यावर तो सावध होता, परंतु दुसरा खाल्ल्यावर तो बेशुद्ध पडला. |
| 135 They all rushed into the house. | ते सर्व त्या घरांत घुसले. |
| 136 I will make an example of you. | मी तुह्मांस अशी शिक्षा करीन कीं, दुसऱ्यास धास्ती पडेल. |
| 137 If he comes to me in the evening, I will give him something. | तो संध्याकाळीं मजकडे आला तर मी त्यास कांहीं देईन. |
| 138 Tell him, if he travel with me, I will give him batta besides his regular pay. | त्याला सांगा कीं, जर तूं माझ्या बरोबर फिरण्यास येशील, तर तुझ्या पगाराशिवाय मी तुला भातेंही देईन. |
| 139 Tell him to tell that rascally boy that if he again laughs when I order him to do any thing; I will take every bit of skin off his body. | त्या लुच्चा पोरास सांगायला त्यास सांग कीं, त्या पोराला मी कांहीं काम करण्यास सांगितलें असतां तो पुन्हा हंसेल, तर त्याच्या अंगाची चांबडी लोंबवीन. |

| | |
|---|---|
| 140 There appears to have been some conversation held prejudicial to me. | असें दिसतें कीं, माझे वाइटाविषयीं कांहीं गोष्ट चालली होती. |
| 141 Ought he or ought he not to have walked slowly instead of running so fast? | भरधांव गेल्यापेक्षां त्याला सावकाशीनें जाणें योग्य होतें कीं नव्हतें ? |
| 142 Although the Raja offered three lacks of Rupees and his two sons as hostages yet the Governor General of India ordered hostilities to be carried on. | राजानें तीन लक्ष रुपये देण्यास काढले आणि आपले दोन पुत्र ओलीस ठेवण्यास कबूल केलें, तथापि हिंदुस्थानचे गवर्नर जनरल साहेबांनीं लढाई चालविण्याचा हुकूम केला. |
| 143 Divide these Rupees into three equal shares. | ह्या रुपयांचे तीन सारखे वांटे करा. |
| 144 The fruit you brought me the time before last, was the best; this is not fit to be eaten; bring better next time. | ह्या मागल्या खेपेच्या मागल्या खेपेस जें फळ त्वां मजकडे आणिलें होतें तें उत्तम होतें; आतां आणिलें आहे हें खावयाजोगें नाहीं, पुढल्याखेपेस याहून चांगलें आण. |
| 145 I missed him on the road. | रस्त्यावर त्याची माझी चुकामूक पडली. |
| 146 I took you for another person. | तुह्मांस ओळखिलें नाहीं, दुसरें कोणी आहे असें मला वाटलें. |
| 147 If you should pass this way to-morrow, call on me if you have time. | जर तुह्मी ह्या वाटेनें उद्यां आलां तर तुह्मांला बनल्यास माझ्या भेटीला या. |
| 148 I cannot afford so much. | माझ्यानें इतकें देववत नाहीं. |
| 149 It is better to die in the field of battle like a man than to fly like a coward. | लढाईत भित्र्यासारखें पळून जाण्यापेक्षां शूरासारखें मरणें हें चांगलें आहे. |
| 150 Did not I warn you at the time of your departure? | तुह्मी निघून गेलां ते वेळेस मी तुह्मांस सुचविलें नव्हतें काय ? |
| 151 Do you personate the King, and I shall represent his prime minister. | तुह्मीं राजाचा वेष घ्या, आणि मी प्रधानाचा घेईन. |

| | |
|---|---|
| 152 I conjure you by God, not to mention this business to any one. | तुह्मांला परमेश्वराची शपथ घालून सांगतों कीं, हें काम तुह्मीं कोणाला कळवूं नका. |
| 153 He is so situated that he must agree to what I propose. | तो अशा अवस्थेंत आहे कीं, मी जें कांहीं सांगेन तें त्यानें कबूल केलें पाहिजे. |
| 154 You may propose it, but I am certain that they will not agree to take it on such terms. | तुह्मांला (त्यांस) सांगणें असेल, तर सांगा, परंतु माझी खात्री आहे कीं, ते अशा अटींनीं तें कबूल करणार नाहींत. |
| 155 It is a difficult matter, but will do it at any rate. | हें काम कठीण आहे खरें, परंतु कांहीं होवो, तें मी करीन. |
| 156 Were you a decent man there would be no necessity for any telling you so often to do your duty. | जर तुह्मी भले असतां, तर आपलें काम करा ह्मणून घडोघडी तुह्मांस सांगण्याची गरज पडली नसती. |
| 157 At this rate his fortune will soon go. | अशानें त्याची दौलत लवकर संपून जाईल. |
| 158 My advice is that you be more cautious in future. | माझा सल्ला हाच आहे कीं, ह्यापुढें तरीं तूं फार सावधगिरीनें राहा. |
| 159 At this rate you make me out a fool. | एकून त्वां मला मूर्ख ठरविलें. |
| 160 I would repair the house had I cash enough. | मजपाशीं पैसा पुरा असता तर मी घर नीट केलें असतें. |
| 161 You may learn Hindustani grammatically if you choose; but I have hitherto picked it up the best way I could without books. | तुह्मांस हिंदुस्थानी भाषा व्याकरणशुद्ध शिकण्याची इच्छा असल्यास खुशाल शिका, परंतु मी तर आज दिवसपर्यंत सांपडेल तसतशी ऐकून शिकलों. |

| | | |
|---|---|---|
| 162 | This white cow and that black horse, are of much more value than the tame elephant which you sent me yesterday. | काल तुह्मीं मला जो पाळलेला हत्ती पाठविला त्यापेक्षां ही पांढरी गाय व तो काळा घोडा हीं फार उपयोगी आहेत. |
| 163 | In the Deccan as well as in most other parts of India, horses are very little used for agricultural purposes. | दक्षिणेंत आणि हिंदुस्थानाचे बहुतेक इतर भागांत घोडे शेतकीच्या कामास क्वचित् लावितात. |
| 164 | If you heard this news yesterday, why did you not come instantly to inform me of it? | जर तुह्मीं ही खबर काल ऐकिली होती तर तत्क्षणींच येऊन मला कां कळविली नाहीं ? |
| 165 | The Patel says that he could give neither butter, milk, eggs, grass nor fowls; in fact, that his village contained nothing at all, but he only wanted a sound thrashing to make him produce every thing you wanted. | लोणी, दूध, अंडीं, गवत, कोंबड्या वगैरे माझ्यानें कांहीं देववत नाहीं. सारांश माझे गांवांत कांहीं नाहीं असें पाटील सांगतो. परंतु त्याला चांगला मार द्याल तर जें जें तुह्मी मागाल तें सर्व तो आणून देईल. |
| 166 | He is afraid to say so to my face and therefore does so behind my back. | माझे तोंडावर तो असें बोलण्यास भितो ह्मणून पाठीमागें असें बोलतो. |
| 167 | The Governor told me that this order was to have had a retrospective effect from the beginning of the year; had it not been for the Court of Directors who prevented its having effect before the date of its issue. | गवर्नर साहेबानें मला सांगितलें कीं, हा हुकूम ज्या तारखेस झाला त्या तारखेच्या पूर्वींच, वर्षाच्या आरंभापासून तो अमलांत यावयाचा होता; परंतु कोर्ट आफ् डायरेक्टर्स यांनीं असें टरविलें कीं, तो झाला त्या तारखे पूर्वींच्या कामास लागू असूं नये. |
| 168 | When he chooses to set to work, he does the work of four days' in as many hours. | जेव्हां तो मनावर घेतो तेव्हां चार दिवसांचें काम तो चार तासांत करितो. |

| | |
|---|---|
| 169 He hanged him on the branch of a tree. | त्यानें त्याला एका झाडाच्या खांदीवर फाशीं दिलें. |
| 170 They had no difficulty in finding excuses for quarrelling. | त्यांस भांडण्याकरितां निमित्तें शोधून काढण्यास कठीण पडलें नाहीं. |
| 171 You will only hurt yourself by doing so. | अशानें तुम्ही आपणास दुखापत मात्र करून घ्याल. |
| 172 The less you have to do with a man of that sort, the better. | अशा माणसाबरोबर जितका थोडा संबंध ठेवाल तितकें चांगलें. |
| 173 As I was going to Poona, I was passed by a man travelling the contrary way. | मी पुण्यास जात असतां, तिकडून एक मनुष्य येत होता, तो माझे जवळून गेला. |
| 174 I supposed so at first, and experience has shown me that I was right. | मी असें पूर्वींच अनुमान केलें होतें, आणि तें खरें आहे असें आतां माझे प्रत्ययास आलें. |
| 175 Stretching forth his neck he looked out afar. | त्यानें मान लांब करून दूर दृष्टि देऊन पाहिलें. |
| 176 The corn sown in that field produced ten-fold. | त्या शेतांत जितकें धान्य पेरलें होतें त्याचे दसपट आलें. |
| 177 He brought a high priced horse. | त्यानें एक मोठे किमतीचा घोडा विकत घेतला. |
| 178 This is the cloth which I bought the other day. | त्या दिवशीं मी कापड विकत घेतलें तें हेंच. |
| 179 If you wish to remain in my service; you ought to do every thing as well as you can. | मजपाशीं तुझी चाकरी कायम राहावी अशी जर तुझी इच्छा असेल तर तुझ्यानें करवेल तितकें हरएक काम चांगलें केलें पाहिजे. |
| 180 From your speech, it would appear that you have informed your father. | तुझ्या बोलण्यावरून असें दिसतें कीं, तूं हें आपले बापास सांगितलें आहे. |
| 181 Your language is so difficult that I cannot understand a word. | तुमची भाषा इतकी कठीण आहे कीं, मला एक शब्दही समजत नाहीं. |

| | |
|---|---|
| 182 I thought the Hindustani language was easy, but now I find it hard. | हिंदुस्थानी भाषा सोपी असें मी समजत होतों, परंतु ती कठीण आहे असें आतां मला वाटतें. |
| 183 My son goes to school every day, and gets his lesson by heart, and when he comes home, he does nothing but plays with his brothers. | माझा मुलगा दररोज शाळेंत जाऊन आपला धडा तोंडपाठ करतो, आणि घरीं आल्यावर भावांबरोबर खेळतो, दुसरें कांहीं करीत नाहीं. |
| 184 If my servant comes here to-day or to-morrow, tell him 'I do not wish to see his face;' because he was impudent. | जर माझा चाकर आज किंवा उद्यां इकडे आला, तर तुह्मी त्याला सांगा कीं, तुझा धनी ह्मणतो कीं, तूं फार उद्धट आहेस ह्मणून मी तुझें तोंड पाहण्यास इच्छीत नाहीं. |
| 185 Before I had a great desire to see him, but not now. | पूर्वीं त्याला पाहण्याची मला फार इच्छा होती, परंतु आतां नाहीं. |
| 186 If you had come before, I would have engaged you. | जर तुह्मी अगोदर आलां असतां तर मी तुह्मांस चाकरीस ठेविलें असतें. |
| 187 If you wish to take it, take it, or else go away. | तें घेणें असेल तर घे; नाहीं तर निघून जा. |
| 188 If you do such an action, I will turn you away. | जर तूं असें काम करशील, तर मी तुला घालवून देईन. |
| 189 He concealed his grief from the world. | त्यानें आपलें दुःख कोणास कळूं दिलें नाहीं. |
| 190 If he had marched one day sooner, he would have met his master. | तो एक दिवस अगोदर निघता तर त्याची आपल्या धन्याशीं गांठ पडती. |
| 191 I found a purse on the bridge. | पुलावर मला थैली सांपडली. |
| 192 Instead of being content, they began to quarrel. | ते संतुष्ट न राहतां कज्जा करूं लागले. |
| 193 How much is his income a year? | वर्षाचें त्याचें उत्पन्न किती आहे ? |

| | | |
|---|---|---|
| 194 | Tell the horsekeeper, that if he does not return quickly, he shall be well beaten; and half his pay shall be cut besides. | घोडेवाल्यास सांग कीं, जर तूं लवकर परत आला नाहींस, तर तुला खुप मार मिळेल, आणि तुझा अर्धा पगार कापला जाईल. |
| 195 | I wished to go out to-day, but on account of a head-ache, I cannot. | आज मला बाहेर जाण्याची इच्छा होती, परंतु डोकें दुखतें ह्मणून जाववत नाहीं. |
| 196 | My horse had given so violent a kick to my horse-keeper, that he has become lame. | माझ्या घोड्यानें घोडेवाल्यास इतकी सडकून लात मारिली कीं, तो लंगडा झाला. |
| 197 | Had I been there, I would not have allowed him to leave the house. | जर मी तेथें असतों तर त्याला घरांतून बाहेर जाऊं दिलें नसतें. |
| 198 | I cannot overlook this unbecoming conduct, and a recurrence of it will certainly be visited by my severest displeasure. | ही गैरशिस्त वर्तणूक मी पोटीं घालूं शकत नाहीं, आणि जर फिरून अशी वर्तणूक झाली तर माझी पराकष्ठेची इतराजी होऊन परिणाम तुह्मांस समजेल. |
| 199 | Unless you give your positive assurance that you will return immediately, I cannot think of suffering you to go. | मी लागलाच परत येईन असें वचन तुह्मी सत्य स्मरून न द्याल तर तुह्मांस जाऊं देण्याची कल्पना माझ्या मनांत सुद्धां येणार नाहीं. |
| 200 | If the famine be so severe that the rich die of hunger, how can the poor escape. | श्रीमान् लोक उपाशीं मरतात असा कठीण दुष्काळ आहे, तर गरीब लोक कसे वांचतील. |
| 201 | It is not likely that he would act with such reserve and secrecy as to transact such a business without consulting some of his friends. | तो आपले कोणी मित्रांचा सल्ला घेतल्यावांचून असें काम संकोचानें व गुप्तपणानें करील, असें संभवत नाहीं. |

| | |
|---|---|
| 202 Had I known before that my cow was such a prodigy of excellence, I should not have offered her for sale in the Bazaar. | माझी गाय इतकी पराकाष्ठेच्या गुणाची आहे, असें जर मला पूर्वी ठाऊक असतें, तर मी तिला बाजारांत विकण्यास काढिलें नसतें. |
| 203 If assistance had arrived immediately after the accident, his life might have been saved. | अपाय झाला त्या वेळेस मदत येऊन पोहचली असती, तर त्याचा प्राण बहुतकरून वांचला असता. |
| 204 By the timely assistance of the fire-engine, the premises have suffered no material damage. | वेळेवर बंबाची मदत येऊन पोहच- ल्यामुळें त्या घराचें नुकसान सांगा- वयासारिखें झालें नाहीं. |
| 205 Can you take it without his seeing you? | त्याच्या नकळत तुमच्यानें ती वस्त घेववेल काय ? |
| 206 The poison that was administered did not operate for two hours. | विष घातलें होतें तें दोन तासपर्यंत लागू पडलें नाहीं. |
| 207 Send me a written, not a verbal message. | मला लिहून पाठीव, तोंडचा निरोप पाठवूं नको. |
| 208 Had it not been for his assistance, I should have failed in my purpose. | जर त्याची मदत न मिळती, तर माझा उद्देश सिद्धीस जाता ना. |
| 209 You must shift for yourself, I should like to remain neuter. | तुमचें तुह्मी पहा, मी मध्यें पडूं इच्छीत नाहीं. |
| 210 One son has taken after the father, and the other after the mother. | एक मुलगा बापाप्रमाणें निघाला आणि दुसरा आईप्रमाणें निघाला. |
| 211 Turn your back towards him, and your face towards me. | पाठ त्याजकडे कर, आणि तोंड मजकडे. |
| 212 Did I walk home or was I carried? | मी चालत घरीं आलों किंवा मला कोणी उचलून आणिलें ? |
| 213 When you left the Bunder, you were supported by another man. | तुह्मी बंदरावरून निघालां तेव्हां तुह्मांला दुसऱ्यानें धरिलें होतें. |

| | |
|---|---|
| 214 I cannot do this in his absence. | त्याच्या मागें हें माझ्यानें करवत नाहीं. |
| 215 Go to my son quickly and tell him that if he does not assist me immediately, I must perish. | माझे मुलाजवळ लवकर जाऊन, त्याला सांगा कीं, जर तूं मला जलदी मदत करणार नाहींस, तर मी खचित मरेन. |
| 216 I not only overtook him but passed him. | मी त्याला आटपलें इतकेंच नाहीं, तर त्याला पाठीमागें टाकिलें. |
| 217 Three men fought four men. | तिघेजण चौघांबराबर लढले. |
| 218 Did you notice clearly the direction from which the noise came? | आवाज कोणत्या दिशेकडून आला, हें तुमच्या लक्षांत स्पष्ट आलें काय ? |
| 219 I wish to hire a servant because I dislike my present one. | हल्लींचा जो चाकर आहे तो मला आवडत नाहीं, ह्मणून दुसरा ठेवण्यास इच्छितों. |
| 220 It is a great pity that he does not look more after his children. | तो आपले मुलांची नीट निगा ठेवीत नाहीं, हें फार वाईट आहे. |
| 221 I will go in a day or two. | मी एक दोन दिवसांनीं जाईन. |
| 222 He beat him brutally. | त्यानें त्याला निर्दयपणानें मारिलें. |
| 223 The shallowness of the water would not allow the boat to sail. | पाणी उथळ होतें ह्मणून नावेला चालतां आलें नाहीं. |
| 224 The waves beat against the rock. | लाटा खडकावर आपटतात. |
| 225 I paid him in proportion to his service. | मी त्याचे चाकरीप्रमाणें त्याला पगार दिला. |
| 226 The river is so deep that we cannot cross it without a boat. | नदी इतकी खोल आहे कीं, नावेवांचून पार जाववत नाहीं. |
| 227 He went without asking any advice. | तो कोणाला सल्ला न विचारितां गेला. |
| 228 I would pay (100) Rupees rather than go away. | शंभर रुपये पडले तरी मी देईन, परंतु येथून जाणार नाहीं. |

| | | |
|---|---|---|
| 229 | He and I remained looking at one another for some time. | तो व मी कांहीं वेळ पर्यंत एकमेकांकडे पाहत राहिलों. |
| 230 | I had nearly reached the summit of the mountain, when the tiger attacked me. | मी पर्वताच्या शिखराजवळ पोंहचलों इतक्यांत वाघ मजवर येऊन पडला. |
| 231 | He tumbled downstairs. | तो जिन्यावरून खालीं घडघडला. |
| 232 | Ever since I have been in this house, I have been sick. | ह्या घरांत आल्यापासून मी अजारी आहें. |
| 233 | Which Ghaut is the steepest? | कोणता घाट फार उभा आहे? |
| 234 | Fill this vessel with water and see how much it will hold. | हें भांडें पाण्यानें भर, आणि ह्यांत किती पाणी मावतें तें पहा. |
| 235 | What were you studying six months ago? | सहा महिन्यांपूर्वीं तुह्मी काय शिकत होतां? |
| 236 | They make up for their deficiency in number by their great size. | तीं थोडकीं आहेत पण मोटालीं आहेत. |
| 237 | This is the long and short of the matter. | हेंच ह्या गोष्टीचें तात्पर्य आहे. |
| 238 | You may go farther and fare worse. | आणखी पुढें जाल तर कदाचित् पस्ताव्यांत पडाल. |
| 239 | It is all nonsense going round about. | लांबण लावून सांगण्यांत कांहीं हंशील नाहीं. |
| 240 | The drawer sticks tight on account of the damp weather. | सर्द हवेमुळें याचा खण घट्ट बसतो. |
| 241 | The wafer sticks closely to the paper. | वेफर कागदाला गच्च चिकटून जातें. |
| 242 | The leech sticks tight to the skin. | जळू कातडीला गच्च चिकटते. |
| 243 | He sticks tightly to his horse. | तो घोड्यावर चांगला चिकटूनबसतो. |
| 244 | You have put me to a great deal of inconvenience by not declaring your intentions sooner. | तुम्हीं आपला बेत लवकर कळविला नाहीं, ह्मणून मी मोठ्या अडचणींत पडलों. |

| | |
|---|---|
| 245 I have a great mind to turn you away. | माझ्या मनांत येतें कीं, तुला चाकरींतून काढून टाकावें. |
| 246 Had you not sense enough to perceive that? | हें समजायापुरती तुला बुद्धि नव्हती काय ? |
| 247 He had twice as many horses as I have. | त्याच्याजवळ माझ्यापेक्षां दुप्पट घोडे होते. |
| 248 His income is treble mine. | त्याचें उत्पन्न माझ्यापेक्षां तिप्पट आहे. |
| 249 Make a quilted cover for the cap to prevent the sun from penetrating it. | रू भरून कापडाचा अभ्रा टोपीला करा, ह्मणजे उन्हाची झळ तींतून येणार नाहीं. |
| 250 I have told you at least three times. | निदान तीन वेळ तरी मी तुह्मांस सांगितलें आहे. |
| 251 I have a competency of riches. | माझ्या जवळ निर्वाहापुरतें द्रव्य आहे. |
| 252 As I was going to Surat, I called at his house. | मी सुरतेस जातांना त्याच्या भेटीसाठीं त्याच्या घरीं गेलों. |
| 253 His house adjoins mine. | याचें घर माझे घराचे लगत आहे. |
| 254 The manner of that speech indicated much disrespect towards me. | ती बोलण्याची रीत अशी होती कीं, तींत माझा अपमान फारच दर्शविला होता. |
| 255 I had fever during the whole of my leave of absence, therefore I could not come. | रजा होती तोंपर्यंत मला ताप येत होता ह्मणून माझ्यानें येववलें नाहीं. |
| 256 This observation appears to be unfounded. | ह्या बोलण्याला आधार आहे असें दिसत नाहीं. |
| 257 If he had not escaped through the drain, he would have been caught and most likely starved to death. | तो मोरिवाटे पळून गेला नसता तर पकडला जाऊन बहुतकरून उपाशीं मरता. |
| 258 My going depends upon your permission. | माझें जाणें तुमचे परवानगीवर आहे. |
| 259 His house is next but one to mine. | त्याचें घर माझे घराजवळचें एक सोडून पलिकडे आहे. |

| | |
|---|---|
| 260 He pretends to speak Hindustani. | तो हिंदुस्थानी बोलण्याचा डौल घालतो. |
| 261 How long was he absent from Bombay? | तो मुंबईंत किती दिवस नव्हता ? |
| 262 In such circumstances what would you have done? | अशा प्रसंगीं तुम्हीं काय केलें असतें! |
| 263 It ought to have been done yesterday, and not left until to-day. | हें काम कालचेकाल करावयाचें होतें, आज राखून ठेवावयाचें नव्हतें. |
| 264 The influence he had over me, induced me to do this. | त्याचे भिडेमुळें हें करण्याकडे माझें मन वळलें. |
| 265 All at once, they came upon me. | ते एकाएकी मजवर येऊन पडले. |
| 266 Suddenly all the people of the village assembled together in a mutinous manner. | गांवांतील सर्व लोक एकाएकी बंड करण्याच्या रीतीनें जमा झाले. |
| 267 He said this concerning him, merely from heresay. | त्यानें त्याविषयीं ही गोष्ट कर्णोपकर्णीं ऐकलेली सांगितली. |
| 268 He did this through spite, and revenge. | त्यानें हें काम केवळ अकुसानें आणि सूड उगविण्यासाठीं केलें. |
| 269 He presumes upon my goodness. | माझा सालसपणा पाहून तो करूं नये तें करितो. |
| 270 Almost the whole of the city was consumed. | बहुतकरून तें शहर सर्व जळून गेलें. |
| 271 Pray, tell your father I wish to see him to-morrow. | कृपा करून आपले बापास सांगा कीं, उद्यां मी तुमची भेट घेण्यास इच्छितों. |
| 272 The house which is building has cost me more than I expected. | जें घर मी बांधीत आहें त्याजबद्दल खर्चाचा सुमार केला होता त्यापेक्षां मला जास्ती खर्च आला. |
| 273 I have the pleasure of sending you my buggy horse to go to Tannah. | मी आपले बगीचा घोडा तुह्मांस ठाण्यास जाण्यासाठीं खुशीनें पाठविला आहे. |

| | | |
|---|---|---|
| 274 | If he had come here at the time I ordered him, all would have gone according to my wishes. | ज्यावेळेस ये ह्मणून मीं त्यास आज्ञा केली होती, त्याच वेळेस तो येथें येता, तर सर्व माझ्या इच्छेप्रमाणें झालें असतें. |
| 275 | During our stay in Bombay, these three men boarded with **me** at three Rupees per month. | आह्मीं मुंबईत होतों तेव्हां हे तिघेजण तीन रुपये दरमहा देऊन आह्मांबरोबर जेवीत होते. |
| 276 | What may your brother be doing now? | आतां तुमचा भाऊ काय करीत असेल बरें ? |
| 277 | I have known him from his infancy. | त्याच्या बाळपणापासून त्याची माझी ओळख आहे. |
| 278 | How many days were you on your way from Poona to Bombay? | पुण्याहून मुंबईस येण्यास तुह्मांस किती दिवस लागले ? |
| 279 | I shall think of you when a vacancy occurs in my department. | माझे खात्यांत एखादी जागा रिकामी होईल, तेव्हां मी तुमची आठवण करीन. |
| 280 | About this time to-morrow I shall have arrived at Poona. | उद्यां ह्या वेळेस मी पुण्यास पोंहचलों असेन. |
| 281 | In a fortnight, I shall have finished this book. | पंधरवड्यांत हें पुस्तक मजकडून पुरें होईल. |
| 282 | Come at 2 o'clock, and by that time I shall have finished my tiffin. | दोन वाजतां ये, त्यावेळेस तिफिन खाऊन मी मोकळा असेन. |
| 283 | If it had not been for you, I would have dismissed him long ago. | तुह्मांकरितां ह्मणून राहिलों, नाहीं तर त्याला मीं कधींच काढिलें असतें. |
| 284 | I might have gone there, if I had liked. | तिकडे जाण्यास मला कांहीं अडचण होती असें नाहीं, पण मला जाण्याची इच्छा नव्हती. |
| 285 | I have lost all my confidence in you. | तुह्मांवरचा माझा सर्व भरंवसा उडाला आहे. |

| | | |
|---|---|---|
| 286 | I shall revenge myself on you for the murder of my father. | मी आपले बापाच्या खुनाचा सूड तुजवर उगवीन. |
| 287 | This road is more frequented than the other. | त्या रस्त्यापेक्षां ह्या रस्त्याची रहदारी फार आहे. |
| 288 | He was nearly off his horse. | थोडें चुकलें, नाहीं तर तो घोड्यावरून पडला असता. |
| 289 | The chandelier which hung from the ceiling fell down, by which all the drops and shades were broken. | छतास झुंबर टांगलेलें होतें तें तुटून खालीं पडलें, आणि त्याचे सर्व लोलक व शेंदं फुटून गेलीं. |
| 290 | I retreated and attempted to run away by the front door; but she seized me by the hair and prevented me. | मी मागें सरून पुढचे दारानें पळून जाण्याचा यत्न केला, परंतु तिनें माझे केस धरून मला अडकाविलें. |
| 291 | The practice of Satee has been prevented by Government. | सती जाण्याची चाल सरकारानें बंद केली आहे. |
| 292 | I was to come here yesterday; but having something to do, I did not. | काल मी येथें यावयाचा होतों, परंतु कांहीं काम पडल्यामुळें आलों नाहीं. |
| 293 | Whenever I want those things, I shall send for them. | मला त्या पदार्थांची गरज पडेल, तेव्हां ते मागवीन. |
| 294 | I asked him for the book; but he did not lend it to me. | मी तें पुस्तक त्याजवळ मागितलें, परंतु त्यानें मला दिलें नाहीं. |
| 295 | If the Jemedar had not, through the temptation of gain, murdered his wife; he would not have been hanged. | जर तो जमादार द्रव्याचे लोभानें आपल्या बायकोचा खून न करिता तर फाशीं गेला नसता. |
| 296 | He has deferred his business till to-morrow. | त्यानें आपलें काम उद्यांचे दिवसावर टाविलें आहे. |
| 297 | I am sure he was not himself that day. | माझी खात्री आहे कीं, त्या दिवशीं तो शुद्धीवर नव्हता. |
| 298 | Though you did not come yourself; at least you might have sent me word. | तुह्मी स्वतां आलां नाहीं, पण मला निरोप तरी पाठवावयाचा होता. |

| | |
|---|---|
| 299 Ask any man in this assembly, 'if the circumstance you charge me with can be possible. | ज्या प्रकरणाबद्दल तुह्मीं मजवर आरोप आणिला तें माझ्यापासून होईल कीं काय? हें ह्या सभेंत कोणासही पुसा. |
| 300 He behaves himself very well. | त्याची वर्त्तणूक फार चांगली आहे. |
| 301 It is not your business to treat with him. | याच्या बरोबर बोलणें लावणें हें तुमचें काम नव्हे. |
| 302 Come, If you mean to come; or else I shall shut the door. | येण्याचें मनांत असेल तर ये, नाहीं तर मी दार बंद करीन. |
| 303 I have before sworn to an acquaintance with this woman. | ह्या बायकोची व माझी ओळख आहे अशी मी पूर्वीं शपथ घेतली आहे. |
| 304 I neither said nor did any thing to him. | मी त्याला कांहीं बोललों सवरलों नाहीं. |
| 305 He no sooner called than I appeared. | त्यानें बोलावतांच मी हजर झालों. |
| 306 I no sooner said so than he ran away. | मी असें बोलतांच तो पळून गेला. |
| 307 God forbid that the ship should spring a leak at sea. | ईश्वर करो कीं, त्या जहाजास समुद्रांत भोंक ( भावडें ) न पडो. |
| 308 A tyrant's life is every hour at stake. | जुलूम करणाराचा जीव सदा सुळावर असतो. |
| 309 It is ten to one that he will come. | तो दहा घांटयांनीं येईल. |
| 310 The more he receives the more he wants. | जसजसें त्याला अधिक मिळत जातें, तसतसा त्याला अधिक लोभ सुटतो. |
| 311 I will do it in spite of thy teeth. | मी तुझ्या नाकावर पाय देऊन तें करीन. |
| 312 Under the veil of friendship, we often find an enemy. | मित्राचे रूपानें बहुधा शत्रु नजरेस पडतो. |
| 313 It is easier to come down a hill than to go up. | पर्वतावर चढण्यापेक्षां खालीं उतरणें फार सोपें आहे. |

| | |
|---|---|
| 314 I told him that if he would satisfy me that he did not charge me more than the market price for the grain, I would give him the money he asked. | मीं त्याला सांगितलें कीं, धान्याची किंमत बाजारभावापेक्षां जास्ती मागितली नाहीं अशी तूं जर माझी खात्री करशील, तर मी तुला मागिल्या प्रमाणें पैसा देईन. |
| 315 I wrote to Mr. Watson this morning, and told him that I would send him the book in a day or two, if he did not want it sooner. | मीं आज सकाळीं वाटसन साहेबास पत्र लिहून कळविलें आहे कीं, जर तुह्मांस ह्या पुस्तकाची तूर्त गरज नसली, तर एकदोन दिवसांत हें पाठवून देईन. |
| 316 He told me that he had suffered great hardships on his travels, that he had been robbed of a part of his property, and obliged to sell the rest to pay his expenses. | त्यानें मला सांगितलें कीं, प्रवासास जातांना मार्गांत मला फार कष्ट भोगावे लागले, आणि माझी मालमत्ता लुटली गेली, आणि बाकीची वाटेस खर्चाकरितां विकावी लागली. |
| 317 Whatever be the consequence, I will go. | कांहीं कां होईना, मी जाईनच. |
| 318 I don't know which is which. | कोण कोणतें हें मला ठाऊक नाहीं. |
| 319 If I had laid two more horses on the road, I should have won my bet. | मार्गांत मी दोन घोडे अधिक ठेवितों तर शर्यत जिंकितों. |
| 320 He stopped my breath. | त्यानें माझा श्वास बंद केला. |
| 321 He suffocated me. | त्यानें माझा दम कोंडिला. |
| 322 He aimed a blow at him with a stone. | त्याला लागावा ह्मणून त्यानें त्याजवर दगड फेंकला. |
| 323 He came an hour too late. | तो एक तास उशिरानें आला. |
| 324 He is very jealous of him. | तो त्यावर फार जळतो. |
| 325 He did it premeditatedly. | त्यानें विचारपूर्वक केलें. |
| 326 He gave me these things one by one. | त्यानें मला ह्या वस्तु एकामागून एक दिल्या. |

| | | |
|---|---|---|
| 327 | I have given him about ten Rupees. | मी त्याला सुमारें दहा रुपये दिले आहेत. |
| 328 | I have come about some business. | मी कांहीं कामासाटीं आलों आहें. |
| 329 | What business is your master about? | तुमचा धनी कोणत्या कामांत आहे ? |
| 330 | If he had informed me on this subject a week before, I would have acted in conformity with his wishes. | त्यानें एक आठवड्या पूर्वीं मला ह्या गोष्टीविषयीं कळविलें असतें, तर मी त्याच्या मर्जीप्रमाणें केलें असतें. |
| 331 | If I were to lend him money to-day, he would require more to-morrow. | जर आज मी त्याला उसना पैसा दिला, तर उद्यां तो दुसरा मागेल. |
| 332 | I have endeavoured by every means in my power to accomplish your wishes; not only, because I wish to oblige you; but also for my own interests. | मीं तुमच्या इच्छेप्रमाणें करण्यास आपलें शक्त्यनुरूप सर्व प्रकारें प्रयत्न केला, तो केवळ तुह्मांवर उपकार करावा ह्मणून केला असें नाहीं. तर त्यांत माझाही फायदा होता. |
| 333 | After all, you have succeeded but badly; I wish (now that it is too late) I had not asked you to assist me in this affair, but had relied upon my own resources. | सरतेशेवटीं तुह्मीं हें काम सिद्धीस नेलें खरें, परंतु यथास्थित झालें नाहीं आणि मी तुमची मदत न मागतां आपलेच सामर्थ्यावर भरंवसा ठेविला असता, तर बरें होतें, परंतु आतां ती गोष्ट गेली. |
| 334 | It cannot be helped, we have gone so far that retreat is impossible; so we must now leave it to fate, and hope all may turn out for the best. | आतां इलाज नाहीं, आपण इतके दूर आलों कीं, परत फिरणें मुष्कील झालें, ह्यासाटीं दैवावर हवाला ठेवून परिणाम चांगला होण्याची आशा धरावी. |
| 335 | Make three copies of this letter; and write in as legible a hand as possible. | ह्या पत्राच्या तीन नकला करा; आणि जितकें सुवाच्य लिहवेल तितकें लिहा. |

| | |
|---|---|
| 336 Remind me of this without fail, when he comes to-morrow. | उद्यां तो येईल, तेव्हां ह्याविषयीं मला स्मरण करा, विसरूं नका. |
| 337 Do not forget this, as you did before. | पूर्वी विसरलां त्याप्रमाणें हें विसरूं नका. |
| 338 Go there, and inquire whether they have arrived or not. | ते अजून पर्यंत आले किंवा नाहीं त्याचा शोध करा. |
| 339 How many have arrived; and how many are still expected? | आले किती आणि यावयाचे किती आहेत? |
| 340 Real and durable happiness is not attainable on earth. | ह्या पृथ्वीवर वास्तविक आणि शाश्वत सुख मिळावयाचेंच नाहीं. |
| 341 Which of you two is the elder? | तुह्मां दोघांत वडील कोणता ? |
| 342 You ought to have applied to me for it. | त्या कामासाटीं तुह्मीं मजजवळ यावयाचें होतें. |
| 343 Had it not been for the timely assistance of the fire-engines, the row of huts in the Lines, would have been consumed. | वक्तशीर बंबाची मदत येऊन पोंहचली नसती, तर लैनींतील झोंपड्यांची रांग जळून गेली असती. |
| 344 Will you drive me to-morrow to the Musjid Bunder? | उद्यां तुह्मी मला मशीदबंदरावर गाडींत घेऊन जाल ? |
| 345 He took him aside to tell him something; but I don't know what it was. | तो त्याला कांहीं सांगण्यासाटीं एकीकडे घेऊन गेला, परतुं काय सांगितलें हें मला टाऊक नाहीं. |
| 346 He comes to me now and then only, so I am not well acquainted with him. | तो कधींकधीं मात्र मजकडे येतो, ह्मणून त्याचा माझा विशेष परिचय नाहीं. |
| 347 Remind me of this to-morrow morning at 10 or ½ past. | उद्यां दहा साडेदहा वाजतां मला ह्या गोष्टीचें स्मरण करा. |
| 348 This horse has been twice ridden this morning, therefore I don't like to ride him again. | हा घोडा दोनदां रपेट करून आला ह्मणून ह्यावर पुन्हा स्वारी करण्याची माझी मर्जी नाहीं. |

| | |
|---|---|
| 349 If he had not absented himself so often, I would not have parted with him. | तो वारंवार गैरहजर न राहता, तर मी त्याला चाकरींतून काढिलें नसतें. |
| 350 I owed him a sum of money last year; but I have since paid it off. | गुदस्तां त्याचे कांहीं रुपये देणें होते, परंतु यंदा मीं ते फेडून टाकिले आहेत. |
| 351 If your horse had not stumbled against the heap of dirt, he would not have been hurt. | जर तुमचा घोडा कचऱ्याच्या ढिगावर अडखळून पडला नसता, तर त्याला कांहीं दुखापत झाली नसती. |
| 352 Did you hear the report of a gun this morning at 7 o'clock? | आज सकाळीं सात वाजतां तुह्मीं तोफेचा अवाज ऐकिला काय ? |
| 353 Have you seen those domestic cocks fighting together? | तुह्मीं त्या पाळलेल्या कोंबड्यांचें झुंज पाहिलें आहे काय ? |
| 354 Her husband is dead and she is become a widow. | तिचा नवरा मरून ती विधवा झाली आहे. |
| 355 He divorced his wife on account of her adultry. | आपले बायकोनें व्यभिचार केला ह्मणून तिचा त्यानें घटस्फोट केला ( सोडचिठी दिली. ) |
| 356 It became mouldy owing to the damp weather. | सर्द हवेमुळें ह्यावर बुरशी आली होती. |
| 357 You did not salt this fish in time, it therefore became putrid. | तूं वेळेवर ह्या माशास मीठ लावलें नाहींस ह्मणून तो सडून गेला. |
| 358 He was in the habit of coming to my house at ten o'clock. | तो माझे घरीं दहा वाजतां येत असे. |
| 359 Had he been at home when these thieves came, he would have saved his property. | चोर आले त्यावेळेस जर तो घरीं असता, तर आपली मालमत्ता वचावता. |
| 360 He takes the greatest trouble about every thing in which he really takes an interest; and, if perseverance will insure success, he is the person above all others to whom you should entrust this business. | जर दीर्घ प्रयत्नानें कामाची सिद्धि होईल असें आहे, तर सर्वांस सोडून त्यासच हें काम सोंपणें योग्य आहे, कारण ज्या कामावर त्याचें मन लागतें त्याविषयीं तो मनस्वी मेहेनत घेतो. |

| | | |
|---|---|---|
| 361 | I perfectly agree with you so far as perseverance goes; but this is a complicated affair, and requires great neatness of hand and decision, as well as perseverance. | दीर्घ प्रयत्नाविषयींचें तुमचें बोलणें मी कबूल करितों, परंतु हें काम घोटाळ्याचें आहे. ह्यांत जसा दीर्घ प्रयत्न पाहिजे तशी हस्तकुशलता व सुधैर्य हीं पाहिजेत. |
| 362 | Well, at any rate as you cannot do better, you had better employ him. | बरें, ज्याअर्थी हें काम तुमच्या हातून ह्यापेक्षां चांगलें होत नाहीं, त्याअर्थी त्याला सोंपून देणें बरें आहे. |
| 363 | Very well, I will take your advice; but remember, should he be unsuccessful, it will entail much useless expense upon me; so consider well, and do not be led away in giving your advice by any feeling of pity for his helpless state. | फार चांगलें, मी तुमच्या सल्ल्याप्रमाणें चालेन; परंतु लक्षांत ठेवा कीं, तो जर कां ह्या कामांत पार पडला नाहीं, तर पुष्कळ खर्च मात्र मजवर पडेल, ह्मणून चांगला विचार करा, आणि त्याची दैन्य अवस्था मनांत आणून भलतेंच सांगूं नका. |
| 364 | You may certainly rely upon my advice, but even should he fail, (of which I have no fear) I will be answerable for the consequences, and make up any pecuniary loss you may sustain. | तुह्मी माझे सल्ल्यावर पक्का भरंवसा ठेवा. तो ह्या कामांत घसरेल ह्या गोष्टीची मला तर फिकीर नाहीं, असेंही असून, जर तो घसरला, तर त्याविषयींचें जोखीम मजवर आहे, आणि जें कांहीं तुमचे पैशाचें नुकसान होईल तें मी भरून देईन. |
| 365 | I am very sorry for the scrape he has got into, it will be such a blow to his father, besides materially injuring his interests with the Governor. | तो अशा संकटांत पडला ह्याविषयीं मला फार वाईट वाटतें. त्याच्या बापास ह्या गोष्टीमुळें मोठा धक्का पोंचेल, ह्याशिवाय गवर्नर साहेबांची जी मेहरबानी त्याजवर आहे, तींत हरकत येईल. |

| | |
|---|---|
| 366 It is a pity you did not know of his intention before he took such a serious step, as I have no doubt your good advice would have had great effect upon him. | वाईट वाटतें कीं, त्यानें अशा कठिण कामांत हात घातल्यापूर्वीं त्याचा तो बेत तुह्मांस कळला नाहीं. कारण माझी खात्री आहे कीं, तुमच्या उपदेशाचें वजन त्याच्यावर बरेंच पडलें असतें. |
| 367 Well, it cannot be helped; and all that is left for me, now to do on his account, is to explain away as much as possible his misconduct, by giving the Governor some insight into the harassing situation in which he was placed. | बरें, झालें त्यास इलाज नाहीं; आतां मला त्यासाठीं करण्याचें एवढेंच राहिलें आहे कीं, तो ज्या अडचणींत पडला आहे, तिजविषयीं गवर्नर साहेबांस खुलासा करून त्याची अशा वाईट वर्त्तणुकेची जितकी संपादणूक होईल तितकी करावी. |
| 368 Well, they say "a friend in need is a friend indeed;" and I trust you will be such to him in this difficulty. | बरें, "संकटकाळीं कामास येतो तोच मित्र" अशी ह्मण आहे; आणि ह्या संकटसमयीं तुह्मी तसे वागाल अशी माझी खात्री आहे. |
| 369 Under such circumstances, his claim would be forfeited. | अशी गोष्ट आहे, तर त्याचा दावा बुडेल. |
| 370 If I had not assisted him; he would have been drowned. | मी त्यास मदत केली नसती तर तो बुडून जाता. |
| 371 In that case, by what weapons could we be defended? | अशा वेळीं कोणत्या हत्यारानें आपण आपला बचाव करूं शकूं? |
| 372 Happy is the man who fears God and looks to him as his father and his friend. | जो परमेश्वराचें भय धाळगतो आणि त्यास आपला बाप व मित्र असें मानितो, तोच धन्य होय. |
| 373 Somehow or other, the dog got loose. | कसा तरी कुत्रा सुटून गेला. |
| 374 You must have it about you somewhere or other. | कोठें नाहीं कोठें तरी ती वस्त तुमच्यापाशीं असावी. |

| | |
|---|---|
| 375 I can't find it any where. | ती मला कोठें सांपडत नाहीं. |
| 376 He is always running about here and there. | तो नेहमीं हिकडे तिकडे धांवधांव करीत असतो. |
| 377 Such as it was; it proved of service. | ती वस्त कशी जरी होती, तरी कामीं पडली. |
| 378 If I do not wind up my watch at night, it will stop before the morning. | मी आपल्या घड्याळास रात्रीं किल्ली दिली नाहीं, तर तें दिवस उगवण्याचे पूर्वींच बंद पडेल. |
| 379 The boy tumbled into the water, luckily for him there was a plank floating, to which he clung and saved himself, or else he would have been drowned. | तो मुलगा पाण्यांत पडला, परंतु नशीबानें एक फळी पाण्यावर तरंगत होती, तिला गच्च धरून त्यानें आपला जीव वांचविला, नाहीं तर तो बुडाला असता. |
| 380 He wants to make a great deal of money in a short time, and with as little trouble as possible. | थोडे काळांत आणि जितके कमी श्रम होतील तितके करून पुष्कळ द्रव्य मिळावें, अशी त्याची इच्छा आहे. |
| 381 He is quite at a loss how to act, being newly arrived, and unacquainted with the manners of the people. | तो नवीन आलेला आहे आणि लोकांच्या रीतीभाती त्यास माहीत नाहींत; ह्मणून कसें करावें, हें त्यास सुचत नाहीं. |
| 382 We must determine upon something or other. | आपण कांहीं तरी ठरविलें पाहिजे. |
| 383 Take both his advice and his assistance, as he offers them. | ज्याअर्थी तो तुह्मांस सल्ला व मदत देऊं इच्छितो, त्याअर्थीं तुह्मीं घ्याच. |
| 384 Mend your manners in time, my friend; or you are a ruined man, and you shall have no mercy. | मित्रा,तूं आपली चालचलणूक आतांच सुधार, नाहीं तर तुझी दुर्दशाच झाली असें समज, आणि तुझ्यावर कोणीही दया करणार नाहीं. |

| | |
|---|---|
| 385 At what hour does the tide serve to go up the river to-day? | आज नदीचे वरचे बाजूस जाण्याला भरती कोणते वेळेस वेतवार पडेल? |
| 386 It is a pity that he did not come sooner, as the murder might have then been prevented. | तो लवकर आला नाहीं हे फार वाईट झालें. कारण तो आला असता, तर त्यानें खून होऊं दिला नसता. |
| 387 The house tumbled down, and buried the inhabitants in its ruins. | तें घर कोसळलें, आणि त्यांतील राहणारे लोक त्यांत गढून गेले. |
| 388 I am so lazy, that I am sure I shall never be able to learn Hindoostani, well enough to pass. | मी इतका आळशी आहे कीं, हिंदुस्थानी भाषा परीक्षा देण्याजोगी कधींही चांगली शिकणार नाहीं; ही माझी खात्री आहे. |
| 389 If you had minded my advice in the first instance; you would not have fallen into these difficulties. | तुह्मी पहिल्यानेंच माझी मसलत ऐकिली असती, तर अशा संकटांत पडलां नसतां. |
| 390 He sometimes does right, and sometimes wrong. | त्याच्या हातून कधीं कधीं बरें काम होतें आणि कधीं कधीं वाईट कामही होतें. |
| 391 He is full of sense and understanding. | तो ज्ञानानें आणि बुद्धीनें परिपूर्ण आहे. |
| 392 You pay the money, I will give you the difference. | तुह्मी पैसे द्या, बाकी फिरेल ती मी देईन. |
| 393 Had I not been very swift, I should have been run through and through, by the horns of the bull. | जर मी लवकर पळालों नसतों, तर बैल मला शिंगांनीं पार भोसकून टाकता. |
| 394 If my horse had kicked instead of rearing, he would have done a great deal of injury. | माझा घोडा उपाई न येतां दुगाण्या झाडता तर मोठी दुखापत झाली असती. |
| 395 This man is convicted of smothering his mother. | आईस दम कोंडून मारल्याचा गुन्हा त्या मनुष्यावर शाबीत झाला आहे. |
| 396 How long is it since you left college? | पाठशाळा सोडून तुह्मांस किती दिवस झाले? |
| 397 About one year and a half. | सुमारें दीड वर्ष झालें. |

| | |
|---|---|
| 398 How long did you remain there? | तुह्मी तेथें किती दिवस होतां ? |
| 399 One year. | एक वर्ष. |
| 400 When you were in college; how many students were there? | तुह्मी पाठशाळेंत होतां, ते वेळेस तेथें किती विद्यार्थी होते ? |
| 401 I think about forty, or fifty. | मला वाटतें सुमारें चाळीस किंवा पन्नास. |
| 402 What different branches of study had you, and which did you most approve of? | तुमच्या अध्ययनाचे कोणकोणते विषय होते, आणि त्यांतून तुमच्या पसंतीस कोणते आले ? |
| 403 Were the teachers who were in college, satisfied with your two years' study? | तुमचें दोन वर्षांचें शिकणें विद्यालयांतील गुरूंच्या खात्रीस आलें काय? |
| 404 When did you leave Europe, in what month, and in what ship did you come? | आपण युरोप कधीं सोडिलें, कोणत्या महिन्यांत, आणि कोणते गलबतांत आलां ? |
| 405 Was your voyage good, and how many days did it occupy? | तुमची सफर चांगली झाली ना, आणि तिला किती दिवस लागले ? |
| 406 When you arrived at the Cape, how was the weather? | तुह्मी केपास पोंहचलां तेव्हां हवा कशी होती ? |
| 407 How long have you remained in Bombay? | तुह्मी मुंबईत किती दिवस राहिलां आहां ? |
| 408 Does the climate of this country agree with you? | ह्या देशाची हवा तुह्मांस मानते काय? |
| 409 When you go up the country, what kind of employment will you prefer, the Judicial, or Revenue line? | तुह्मी देशांत गेल्यावर कोणतें काम घ्याल, दिवाणी किंवा मुलखी ? |
| 410 Before I came away from England, the King was crowned, I did not see the coronation; but saw the representation of it, at both theatres. | इंग्लंडाहून निघण्याचे पूर्वी राजास पट्टाभिषेक झाला होता, तो समारंभ माझ्या पाहण्यांत आला नाहीं खरा, परंतु दोन्ही नाटकगृहांत त्याची नक्कल पाहिली. |

| | | |
|---|---|---|
| 411 | The people of this country are generally litigious, and at enmity with each other, and by making false charges, harass one another. | ह्या देशांतील लोक बहुतकरून वाद-प्रिय असून, एकमेकाशीं शत्रुत्व करितात, आणि खोटें तरकट आणून एकमेकांस दुःख देतात. |
| 412 | In your country are earthquakes common? | तुमच्या देशांत धरणीकंप वारंवार होतात काय? |
| 413 | Has the Government any demand upon him? | त्यांजवर सरकारचें कांहीं मागणें आहे काय? |
| 414 | If you solve the question, you are more learned, than I thought you were. | जर तुह्मी ह्या प्रश्नाचा उलगडा करांल, तर मी तुह्मांस समजत होतों, त्यापेक्षां अधिक विद्वान् समजेन. |
| 415 | Yes Sir, if you mean me to go there, I must express the whole of my opinion. | होय, महाराज, मी तेथें जावें असाच जर तुमचा इरादा असला, तर मला आपलें सर्व मत स्पष्ट कळविलें पाहिजे. |
| 416 | Did you suppose me capable of such a mean action as that? | ह्या प्रकारचें नीच काम मी करीन, असें तुह्मांस वाटतें काय? |
| 417 | Nothing puts me in a rage sooner than insolent language. | उर्मट भाषणानें जसा मी संतापतों तसा दुसरे कशानेंही लवकर संतापत नाहीं. |
| 418 | It is extremely surprising, that men will act in such a manner; but it cannot be helped. | माणसें अशा रीतीनें वर्त्ततात, ही मोठे आश्चर्याची गोष्ट आहे; परंतु काय करावें, नाइलाज आहे. |
| 419 | Could they have done that without its being noticed? | कोणास माहीत झाल्यावांचून, त्यांच्यानें तें काम करवलें असतें? |
| 420 | I took no notice of the shameful conduct. | त्या लाजिरवाणे वर्त्तणुकेकडे मी मुळींच लक्ष दिलें नाहीं. |
| 421 | If such actions are permitted; what will be the end of it? | जर अशीं कामें करूं दिलीं तर त्याचा परिणाम काय होईल? |

| | |
|---|---|
| 422 For whom are you in mourning? | कोणासाठीं तुह्मीं दुःखाचीं वस्त्रें ( ह्मणजे काळीं वस्त्रें ) घेतलीं? |
| 423 I told him to see the cow milked in his own presence. | मी त्याला सांगितलें कीं, आपल्या समक्ष गाईचें दूध काढीव. |
| 424 They thought, that I was expressing contempt for their King. | त्यांस असें वाटलें कीं, मी त्यांचे राजाचा तिरस्कार करीत आहें. |
| 425 When you are on board ship, are you ever troubled with sea sickness? | तुह्मांस कधीं गलबत लागतें ? |
| 426 I do not know the sum exactly; but by guess it is about twenty Rupees. | मला बराबर रक्कम ठाऊक नाहीं, परंतु अनुमानानें वीसएक रुपये असतील. |
| 427 You were mistaken in what you told me yesterday. | काल तुह्मीं मला जें सांगितलें, त्यांत तुमची चूक होती. |
| 428 He did so, thinking that he would derive some benefit from it; but he found himself mistaken. | फायदा होईल अशा समजुतीनें त्यानें तें केलें, परंतु शेवटीं तो फसला. |
| 429 I think that if he had not been there, I might have done so; but his presence prevented me. | मला वाटतें कीं, जर तो तेथें नसता, तर मी तसें केलें असतें, परंतु तो होता ह्मणून मी केलें नाहीं. |
| 430 I have come to know your determination on this subject. | ह्या गोष्टीविषयीं तुह्मीं निश्चय काय केला आहे तो समजून घेण्यास मी आलों आहें. |
| 431 All this is very well; and I have no doubt, it will be of essential use to the boys before they go up to the examination. | हें सर्व ठीक आहे, आणि मुलांस परीक्षेस जाण्यापूर्वीं हें फार उपयोगीं पडेल, अशी माझी खात्री आहे. |
| 432 What a cheat that fellow is, I had no idea, that he was such a rascal. | तो किती ठक आहे. तो इतका लुच्चा आहे असें माझे ध्यानींमनीं-ही नव्हतें. |
| 433 If you will allow me, Sir, I will take your son up to Poona. | साहेब, जर तुह्मी नेऊं द्याल, तर मी तुमच्या मुलास पुण्यास नेईन. |

| | |
|---|---|
| 434 I could not prevail upon him to remain here longer. | त्यास येथें राहण्याविषयीं मी आग्रह केला, परंतु चाललें नाहीं. |
| 435 If there be any mistakes, rectify them carefully. | जर कांहीं चूक असेल, तर लक्ष लावून शुद्ध करा. |
| 436 I had fallen into the river but for him. | जर तो नसता, तर मी नदींत पडलों असतों. |
| 437 Had it not been for his assistance, I should have failed in my purpose. | त्याची मदत जर न मिळती, तर माझें कार्य सिद्धीस न जातें. |
| 438 It is not material, whether you go or not. | तूं जा किंवा राहा, दोन्ही सारखींच आहेत. |
| 439 This man is a fool, in comparison with him. | त्याच्याशीं तुळणा करून पाहिलें असतां, हा मूर्ख आहे. |
| 440 Woman is weak in comparison with man. | पुरुषाशीं ताडून पाहिली तर बायको निर्बळ आहे. |
| 441 He called me a liar, but I made him eat his words | त्यानें मला लबाड ह्मटलें, परंतु आपण चुकलों असें त्याजकडून मी कबूल करविलें. |
| 442 What would you do with these articles ? | ह्या जिनसांचें तुह्मीं काय कराल ? |
| 443 Send me some ready-made pens. | कांहीं लेखण्या करून माझ्यासाठीं पाठवा. |
| 444 At this time I generally find myself indisposed. | ह्या वेळेस बहुतकरून मला बरें वाटत नसतें. |
| 445 I found this chain on the road. | ही सांकळी मला रस्त्यावर सांपडली. |
| 446 I have little chance of succeeding in so difficult an enterprise. | मला ह्या कठीण कामांतून पार पडण्याची थोडीच आशा आहे. |
| 447 I made inquiries; but found no Doctor within the range of a mile from the spot where he fell. | मी शोध केला, परंतु ज्या जाग्यावर तो पडला होता, तेथून अर्धकोशपर्यंत कोणी वैद्य मिळाला नाहीं. |

448 I speak candidly when I tell you that you will never pass unless you listen to my advice in improving your pronunciation.

माझे सांगण्याप्रमाणें तुह्मी आपला उच्चार नीट कराल तोंपर्यंत परीक्षेंत उतरणार नाहीं, हें मी तुह्मांस निष्कपटानें सांगतों.

449 I take the liberty of informing you that you hurry over your speaking and translating, therefore, I wish you would speak every word with deliberation in future.

मी बोलतों ह्याची क्षमा असावी, तुह्मी बोलते वेळेस व भाषांतर करते वेळेस फार उतावळी करतां, तर पुढें तुह्मीं प्रत्येक शब्द विचारानें बोलावा असें मी इच्छितों.

450 The people in that district were living on such bad food, that I cannot conceive how they digested it.

त्या परगण्यांतील लोक असें वाईट अन्न खात होते कीं, त्याचें त्यांना कसें पचन होत होतें हें मला समजत नाहीं.

451 I saw many common people in the Camp Bazaar at Sattara eating and giving to their infants raw carrots, and many other nasty things.

मीं सातारचे छावणीचे बाजारांत पुष्कळ सामान्य (हलके) लोकांस कच्चीं गाजरें व दुसरे वाईट पदार्थ खातांना व आपले मुलांस देतांना पाहिलें.

452 Does your glass magnify or diminish the appearance of things?

तुमच्या भिंगांतून पदार्थ मोठा दिसतो किंवा लहान?

453 Does your watch go fast, or slow?

तुमचें घड्याळ जलद चालतें किंवा हळू?

454 "A habit contracted in youth cannot easily be altered."

जी खोड लागली बाळा ती न सुटे जन्मकाळा.

455 "Better alone than in ill company."

कुसंगतींत राहण्यापेक्षां एकटें राहणें चांगलें.

456 "Confide not in him, who has once deceived you."

ज्यानें आपणास एक वेळ ठकविलें त्याजवर विश्वास ठेवूं नये (ज्यानें दिल्या हातावर तुरी त्याला न विश्वासावें कोणे वारीं.)

| | |
|---|---|
| 457 "Debt is the worst poverty." | ऋण हें अति निकृष्ट दारिद्र्य होय. |
| 458 "Evil communications corrupt good manners." | चांगल्या रीति वाईट संगतीनें बिघडतात. ( संगति संगदोषेण. ) |
| 459 "For the wise a word, for a fool a cudgel." | शहाण्याला शब्द, मूर्खास टोणपा. |
| 460 "Good words cost nothing." | बरें वाचे, काय वेंचे. |
| 461 "He who swims in sin will sink in sorrow." | जो पापांत पोंहतो, तो दुःखांत बुडेल. |
| 462 "Industry is fortune's right hand and frugality her left." | लक्ष्मीचा उजवा हस्त उद्योग आणि डावा हस्त अल्पव्यय. |
| 463 "Judge nothing at first sight." | एक वेळांच पाहून न्याय करूं नये. |
| 464 "Kings as well as beggars are subject to death." | राव आणि रंक दोघेही मृत्यूस पात्र होत. |
| 465 "Laziness is the sister of beggary." | आळस भिकेची बहीण. |
| 466 "Many talk like philosophers and yet live like fools." | लोका सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडे पाषाण. |
| 467 "No one has in hand the thread of life but God." | ईश्वरावांचून दुसऱ्या कोणाचे हातीं आयुष्याची दोरी नाहीं. |
| 468 "Of all prodigality, that of time is the worst." | सर्वांपेक्षां काळाचा दुर्व्यय करणें हें फार वाईट. |
| 469 "Passion makes fools of the wise." | राग शहाण्यास मूर्ख करितो. |
| 470 "Render not evil for evil." | वाईटास वाईट करूं नको. |
| 471 "Such as the tree is, such is the fruit." | जसें झाड तसें फळ. |
| 472 "To a full stomach all meat is bad." | भरले पोटा उंबर कडू. |
| 473 "Unless God assist us, our efforts are in vain." | ईश्वरानें साहाय्य केल्यावांचून आपले प्रयत्न निष्फळ होत. |
| 474 "Vice is infamous though in a prince." | दुर्गुण राजपुत्रांत जरी असला तरी तो दुर्लौकिककारक होय. |
| 475 "Where there is a will there is a way." | इच्छा असली ह्मणजे मार्ग सुचतो. |
| 476 "Youth is the season for improvement." | तारुण्य-सुधारणा ( गुणसंपादन ) करण्याचा काळ होय. |

## FORM OF A COURT MARTIAL.

At a Native Regimental Court Martial assembled at Camp Rajkote on Monday the 7th day of March 1865, by order of Major Christie, Commanding the 17th Regiment N. I. for the trial of all prisoners that may be brought before it.

*Present.*

President.

Members.

Lieutenant Warden, Superintending Officer.
Ens. Ducat, Interpreter.

Balaram, Private No. 4, of Capt Reynold's Company 17th Regiment N. I. appears a prisonor before the Court.

The orders directing the assembly of the Court and appointing the Superintending Officer, Interpreter, President and Members are read.

Ques., Superintending Officer. —Private Balaram, have you any objection to any of the Officers present sitting on your trial?

Answer.—No.

The Suptg. Officer &c. are duly affirmed.

## कोर्टमार्शलचा नमुना.

काळेपलटणीचे कोर्ट मार्शल मेजर ख्रिस्ती साहेब १७ वे पलटणीचे कमांडिंग सरदाराचे हुकुमावरून तारीख ७ रोज सोमवार माहे मार्च सन १८६९ इसवी रोजीं मुकाम राजकोट एथील छावणींत जे कैदी त्याहुजूर आणिले जातील त्यांची चौकशी करण्याकरितां जमा झालें आहे.

हजीर—मजालस.

सरपंच.

पंच.

लेफतनंत वार्दिन काम चालविणारा.
इनसेन डुकट, दुभाषा.

बाळाराम शिपाई नंबर ४. कप्तेन रेनलड्स साहेब १७ पलटण ह्याचे कंपनींतील कोर्टा हुजूर कैदी होऊन येतो.

कोर्ट जमविण्याचा हुकूम आणि काम चालविणारा, दुभाषी, सरपंच व पंच ह्यांस नेमण्याविषयींचा हुकूम वाचून दाखविला.

काम चालविणारा साहेब ह्याचा प्रश्न. —अरे शिपाई बाळाराम, जे सरदार चौकशी करण्याकरितां बसले आहेत त्यांतून कोणाविषयीं तुझी हरकत आहे काय?

उत्तर.—कांहीं हरकत नाहीं.

काम चालविणारा वगैरे ह्यांस चालीप्रमाणें शपथ दिली.

Private Balaram placed in confinement by order of the Officer Commanding 17th Regiment N.I. on the following charge :—

*Charge.*

For most disgraceful and unsoldier-like conduct in having on the 15th ultimo forcibly entered the hut of Private Ramsing between the hours of 9 and 10 P.M. and then and there foully abusing and otherwise maltreating the sister of said Private Ramsing who was then on picquet duty outside the Treasury.

By order,

(Signed.) C. B. LA TOUCHE,
Adjutant, 17th Regiment N. I.

Camp Rajkote, 1st March 1859.

Private Balaram, how say you, are you guilty or not guilty, of the crime laid to your charge?

Ans.—Not guilty.

All witnessess summoned on this trial are ordered to withdraw.

Charles Blunt LaTouche Lieut. and Adjut. appears in Court as prosecutor, and proceeds to call witnesses in support of the charge.

शिपाई बाळाराम १७ वे काळे पलटणीचे सरदार कमांडिंग ह्यांचे हुकुमावरून खालीं लिहिलेले अपराधास्तव कैदेंत ठेविला.

अपराध.

निलाजऱ्या आणि शिपायगिरीचे विरुद्ध चालीनें वागला ह्मणजे माहे गुदस्त तारीख १५ रोजीं ९ वरांपासून १० चे आंत रात्रौ शिपाई रामशिंग पिकिटावर तिजोरीचे बाहेर असतां त्याचे झोंपडींत घुसून त्यानें शिपाई मजकुराचे बहिणीस शिवीगाळ देऊन जुलूम केला.

हुकुमानें,

( सही ) सि. बी. लतु, अडजुंतन,
१७ वी. का. प.

छावणी राजकोट.
तारीख १ मार्च सन १८५९.

शिपाई बाळाराम, तुझें काय ह्मणणें आहे ? जो आरोप तुझ्यावर आणिला आहे, ह्याविषयींचा तूं अपराधी आहेस किंवा नाहींत ?

उत्तर.—मी अपराधी नाहीं.

जे साक्षीदार ह्या चौकशींत आणविले होते त्यांस बाहेर जाण्यास हुकूम दिला.

चार्लस ब्लंट लतु लेफ्तेनंत व आजुंतन वादी होऊन कोर्टांत येतो आणि अपराध शाबीद करण्यासाठीं साक्षीदारांस बोलावितो.

1st. Evidence for the prosecution Havildar Shaikh Ally Pay-orderly of No. 4 Company called into Court and duly affirmed.

Ques. by Pros.—Do you know the sister of Private Ramsing?

Ans.—Yes. She lives in my neighbourhood.

Ques. by Pros.—Did any disturbance occur between the sister of Private Ramsing and the prisoner?

Ans.—About fifteen or twenty days ago between the hours of 8 or 9 in the evening, I was going to the river to fetch water, on returning I heard a woman's voice in the house of Private Ramsing crying out for assistance. I immediately ran towards the house of Private Ramsing and found a man had got her down and was lying on the top of her. I seized him and began to call out for aid, when I first seized him, the man began to supplicate to let him go and on my refusing to do so, he struck me several times and endeavoured to make his escape; however I would not, but kept calling out; in this manner I dragged him to the Subhedar to whom I reported the same.

पहिला साक्षीदार हवलदार शेक अल्ली पे आर्दरली कंपनी नंबर ४ ह्यास वाद शाबीद करण्यासाठीं कोर्टांत बोलावून शपत दिली.

वादीचा प्रश्न.—शिपाई रामसिंग ह्याचे बहिणीस तूं ओळखितोस ?

उत्तर.—होय. ती माझे शेजारीं राहते.

वादीचा प्रश्न.—कैदी आणि शिपाई रामसिंग ह्याचे बहिणीशीं कांहीं तंटा झाला काय ?

उत्तर.—सुमारें पंधरा किंवा वीस दिवसांमागें संध्याकाळीं ८ किंवा ९ वाजतां मी पाणी आणण्याकरितां नदीवर जात होतों आणि परत येतांना शिपाई रामसिंग ह्याचे घरांत धांवारे धांवारे असा एका बायकोचा शब्द ऐकिला, तेव्हां लागलाच मी शिपाई रामसिंग ह्याचे घराकडे धांवत गेलों, तेव्हां एक मनुष्य तिला खालीं पाडून वर पडला आहे असें माझे दृष्टीस पडलें. त्यास मी धरून कोणी मदतीस या ह्मणून ओरडलों. जेव्हां मी त्यास पहिल्यानें धरिलें तेव्हां तो जाऊं द्या अशी विनंती करूं लागला. मग मी सोडीत नाहीं असें पाहून त्यानें मला पुष्कळ वेळ मारिलें आणि सुटून जाण्याचा यत्न केला. तथापि मी त्यास जाऊं दिलें नाहीं, परंतु पुकारा करीत राहिलों. त्याप्रमाणें त्यास ओढीत सुभेदाराकडे नेलें आणि त्यास सर्व हकीकत कळविली.

Ques. by Pros.—Did you know who the man was when you first came up to her assistance?

Ans.—Yes, I immediately recognised him, it was the prisoner now before the Court.

Ques. by Pros.—How far was your house from Ramsing's?

Ans.—About 10 or 15 yards.

Ques. by Pros.—Did any one else besides yourself run out to her assistance?

Ans.—At first no one came, but when they heard my shouts, several came running out, the first of whom was Naik Peerkhan.

(The prosecution is here closed.)

*Defence.*

The prisoner being put on his defence states, that the charge is entirely false, that it is brought against him by Private Ramsing's sister through spite, and hatred, wishing to ruin him in the eyes of his Commanding Officer.

The prisoner calls on Captain Reynolds, Commanding No. 4 Company for a character.

Captain R. called into Court and duly sworn.

वादीचा प्रश्न.—जेव्हां तूं पहिल्यानें तिचे मदतीस आलास तेव्हां तो कोण मनुष्य होता तें तुला माहीत होतें?

उत्तर.—होय; कोर्टासमोर जो कैदी आतां आहे हाच असें मी लागलेंच ओळखिलें.

वादीचा प्रश्न.—रामसिंगाचे घरापासून तुझें घर किती दूर होतें?

उत्तर.—सुमारें १० किंवा १५ पावलें.

वादीचा प्रश्न.—तुझे शिवाय तिचे मदतीसाटीं दुसरा कोणी धांवून आला?

उत्तर.—पहिल्यानें कोणी आला नाहीं, परंतु जेव्हां माझ्या आरोळ्या ऐकिल्या तेव्हां पुष्कळ धांवून आले, त्यांत पहिल्यानें नाईक पीरखान आला.

(वाद मह्कूब झाला.)

**प्रतिवाद.**

प्रतिवाद करण्याकरितां कैदी ह्मणतो कीं, ही फिर्याद अगदीं खोटी आहे आणि शिपाई रामसिंग ह्याचे बहिणीनें वैरभावानें आणि आकसानें कमांडिंग साहेबाचे हुजूर माझी अब्रू घेण्याकरितां मजवर फिर्याद केली आहे.

कैदी आपली वर्त्तणूक समजाविण्याकरितां कप्तेन रेनल्ड्स साहेब ४ कंपनीचे कमांडिंग ह्यांस बोलाविण्यास सांगतो.

कप्तेन रेनल्ड्स साहेब ह्यास कोर्टांत बोलावून शपत दिली.

Ques. by prisoner.—How long have you known me, and have I ever to your knowledge been brought to trial before or taken before the Commanding Officer as a defaulter?

Ans.—I have known the prisoner for the last five years, during which time he has never been brought before the Commanding Officer. I have always considered him an attentive good soldier, and most respectable character.

Capt. Reynolds here withdraws.

The defence is here closed.

The Court being closed, proceeds to deliberate on its finding.

*Finding.*

The Court having found the prisoner "guilty" as above specified and having received evidence of his general character, does adjudge him Private Balaram to undergo three month's imprisonment of which twenty-eight days of the first and last month respectively are to be in solitary confinement at such place as the confirming authority may be pleased to direct.

The prisoner is remanded into confinement, all parties are discharged from further attendance and the Court is closed.

कैदी विचारितो कीं, तुमची माझी ओळख पडून किती दिवस झाले, आणखी ह्या पूर्वी मी अपराधी ठरवून कमांडिंग साहेबाहुजूर चौकशी होण्या करितां कधीं आलों होतों असें तुह्मांस माहीत आहे काय ?

उत्तर.—पांच वर्षें झालीं आमची आणि कैदीची ओळख झाली, त्या दिवसांत कमांडिंग साहेबापुढें हा कैदी कधीं आला नाहीं. तो अब्रूदार व हुशार शिपाई आहे असें माझे पाहण्यांत आलें आहे.

कप्तेन रेनल्ड्स साहेब बाहेर जातो.

प्रतिवाद महकूब झाला.

चौकशीचें काम बंद होऊन कोर्ट निवाड्याविषयीं विचार करितें.

**निवाडा.**

वर लिहिल्याप्रमाणें कोर्टानें कैदीस अपराधी ठरवून मागील शिक्षेचा व त्याचे चांगले वर्त्तणुकीविषयींचा पुरावा घेऊन तो शीपाई बाळाराम ह्यास तीन महिन्यांची कैदेची ठेप दिली. त्यांत पहिले व शेवटले महिन्याचे अठ्ठावीस अठ्ठावीस दिवसांनीं एकांत खोलींत ज्या जागीं मंजूर करणारे अखत्यारी हुकूम देतील तेथें ठेविला जाईल.

कैदीस पुन्हा कैदेंत पाठवून व सगळे लोकांस रजा देऊन कोर्ट बंद केलें.

# REPORTS.

## No. 1.

Translation of a report from Keshow Ramchandra,
Mamlutdar of the city of Poona.

To,

Framjee Nusserwanjee Esq.,
Deputy Collector, Sudder Station Poona.

Dated 26th July 1862.

After compliments.

Further, I beg to represent that the contract for selling poisonous substances in the Boodhwar Peit of the city of Poona during the year 1862-63 having been purchased by one Govind Keshow Dund Naik at a public auction, and one Sukharam Balkrishna Beheray having presented a petition offering to pay a larger sum than that offered by (Govind Keshow Dund Naik,) you sent an order No. 435, dated 21st July 1862, directing me to send over the above two parties to you on the 26th idem. I now beg to state that a search has been made for two days for Sukharam Balkrishna, and I learn from the inmates of his house that he is not here, but has gone to Luwulay Talooka Huwaylee, and that he will come (back) to-day or to-morrow. I have, therefore, not sent Govind Keshow alone to you. I shall hereafter send the two parties as ordered on the return of Sukharam Balkrishna to his house. I write this for your information.

## No. 2.

Translation of a report from Purshram Bajee,
Acting Mamlutdar of Talooka Mawul.

To

E. C. Jones Esq., Collector of Poona.

Dated 21st November 1854,

After compliments.

Further, Baboorao Trimbuck Dabaray having died, you issued to me an order No. 8, of 1854 to attach his Surinjamee Mokasas. The order directs the attachment of the Mokasa of Mowje Kulmbe and as the village is situated within the jurisdiction of the Sucheo,

# रपोट.

## नंबर १.

हाजरत खुदावंद फ्रामजी नसरवानजी इस्कोयर.

•बाहादुर डिपुटी कलेकटर सदर स्टेशन जिल्हा पुणें यांचे हुजरास.

अर्जदास्त फिदवी केशवराव रामचंद्र मामलेदार तालुके शहर पुणें, सलाम तागाईत तारीख २६ माहे जुलई सन १८६२ इसवी पावेतों सरकार कामांत हजर असो, दिगर मजमून अर्ज ऐसाजे, शहर पुणें एथील बुधवार पेठेबद्दल सन १८६२–६३ चें विषयुक्त पदार्थांचें लिलांव गोविंद केशव दंडनाईक याचे नांवें झालें असून त्याजवर जास्ती बोलण्याविषयीं सखाराम बाळकृष्ण वेहेरे राहणार पेठ नारायण यानें अर्ज केला आहे, सबब त्या दोघांस तारीख २६ जुलई १८६२ रोजीं हुजूर पाठवावें ह्मणून साहेबांचा हुकूम नंबर ४३५ तारीख २१ मिनहूचा सादर झाला ऐशियास सखाराम बाळकृष्ण याचा अर्ज दोन रोज तपास करितां येथें नाहीं, लवळें तालुके हवेली येथें गेला आहे; आज अगर उद्यां येईल असें त्याचे घरचे माणसांकडून कळून आलें, सबब गोविंद केशव या एकट्यासच हुजूर न पाठवितां सखाराम बाळकृष्ण घरीं आल्यावर हुकुमाप्रमाणें दोघांस मागाहून पाठवून देतों जाहीर होण्यास लिहिलें आहे. रोष न होय हे अर्जदास्त.

दाखल ता. २६ मिनहू. केशव रामचंद्र मामलेदार.

## नंबर २.

अज्जम मेहेरबान ई. सी. जोन्स साहेब इस्कोयर, कलेकटर बाहादुर जिल्हा पुणें. अर्जदास्त फिदवी परशुराम बाजी आगटिंग मामलेदार तालुके मावळ, सलाम दिगर मजमून बाबूराव त्रिंबक दाभाडे मयत झाले सबब त्यांचे सरंजामी मोकासे जप्त करावे ह्मणून, खावंदांचा हुकूम नंबर ८ सन १८५४ इसवीचा सादर झाला; त्या हुकुमांत कळंबी गांवचा मोकासा जप्त करण्याची आज्ञा झाली त्याप्रमाणें अंमल होण्याकारितां सदरहू गांव सचिव यांचे हद्दींत

I wrote to the Patel and Koolkurnee of that place, as also to the Vakeel of the Sucheo, but I did not receive the revenue. I therefore wrote to you on the 1st June 1854, requesting that a reference might be made to the Sucheo, and that measure might be adopted for the recovery of the Revenue. I have, however, received no orders from you in reply, nor have I received any portion of the Revenue of the village. I therefore request that you will be pleased to refer to the proceedings quoted above, to make reference to the Sucheo, and to adopt measures for the early payment of the revenue.

---

No. 3.

To,

EDMUND CHAMPAGNE JONES, Esquire,

Collector of Zilla Poona.

From,

Raghvendra Nursinha, Mamlutdar of Talooka Haveíee.

After compliments.

Mohsun Alikhan wullud Husunkhan Soudagur having made a petition to the effect that Manickbhaee wullud Peerbhaee Coachman was building a house on a piece of Government land in Peit Ruwiwar. I instituted an inquiry into the matter. It appears that Khyrunbaee wife of Moorarkhan used formerly to live on the land alluded to by the petitioner that she sold it to Shaikh Hyder for Rupees 25 as per deed of sale exhibit No. 4, and that the latter sold it to the defendant as per deed of sale exhibit No. 5. The defendant states he holds the land by virtue of the deed in question and his statement is borne out by witnesses Nos. 9, 10 and 11. No one is however able to state how the original seller Khyrunbaee came to possess the land. The Koolkurnee states that the piece in question together with the adjoining land belongs to Government, I think, that until the right of ownership is duly established no one should be permitted to hold the land and I therefore beg to submit the case for your orders.—Dated 31st August 1855.

असल्यामुळें आह्मी तेथील पाटील कुळकर्णी व सचिवांचे वकील यांजकडे लिहिलें, परंतु त्यांकडून वसूल आह्मांस पावला नाहीं, यास्तव सचिव यांजकडे लिहून जाऊन पैसा वसूल होण्याची तजवीज व्हावी ह्मणून खावंदांस तारीख १ जून १८५४ इसवी रोजीं रपोट केला; परंतु त्याजवरून काय तजवीज झाली तें कळत नसून गांवाकडून वसुलापैकीं कांहींच आलें नाहीं. सबब पुन्हा अर्ज करून कळवितों कीं, वर लिहिलेलें प्रकरण पाहून सचिव यांकडे लिहून जाऊन लवकर वसूल होण्याची तजवीज करण्यांत यावी.—तारीख २१ माहे नवेंबर सन १८५४ इसवी.

---

## नंबर ३.

अज्जम मेहरबान एडमंड चांपेन जोन्स साहेब,

कलेकटर बाहादुर जिल्हा पुणें.

खिजमतीस राघवेंद्रराव नरसिंह मामलेदार तालुके हवेली सलाम दिगर मजमून रविवार पेठेंत सरकारी जागा आहे त्यावर माणिकभाई वल्लद पिरूभाई गाडीवाला घर बांधीत आहे ह्मणून मोहसन आलीखान वल्लद हुसनखान सौदागर ह्यानें अर्जी केली त्यावरून आह्मी त्या बाबतीची चौकशी केली तिजवरून असें दिसतें कीं, अर्जदारानें लिहिलेल्या जागेवर खैरेण बाईमुरारखान ही पूर्वी राहत असे व तिनें ती जागा २५ रुपयांस निशाणी ४ चे दाखल केलेल्या खरेदीखताप्रमाणें शेख हैदर ह्यास विकली व त्यानें ती निशाणी ५ चे दाखल केलेल्या खरेदीखताप्रमाणें प्रतिवादीस विकली. प्रतिवादी ह्मणतो कीं, ती जागा सदहू दस्तऐवजाचे आधारावरून मजकडे आहे हें ह्मणणें नंबर ९–१० आणि ११ चे साक्षींवरून शाबीत होत आहे; परंतु खैरणबाई ( मूळची विकणारी ) हिच्या ताब्यांत ती जागा कशी आली ह्या विषयीं कोणाच्यानें सांगवत नाहीं. सदहू जाग्याचा तुकडा शेजारले जमिनीसुद्धां सरकारी आहे असें कुळकर्णी ह्मणतो ह्याकरितां धनीपणाचा हक्क चांगले रीतीनें शाबीत होईपर्यंत ही जागा कोणासही आपले ताब्यांत ठेवूं देऊं नये असा माझा अभिप्राय आहे. सबब हें प्रकरण आपलेकडे हुकूम होण्याकरितां पाठविलें आहे.—तारीख ३१ माहे आगस्त सन १८५५ इसवी.

# DEPOSITION

## No. 1.

I having made solemn affirmation state that my name is Janojee, my father's name Girjorjee, my age about forty years. I am Hindu, my caste Koonbee, my profession cultivator, my residence Kurkalla. That I was in the Kutcherry of the Mamlutdar at Kurkalla, when prisoner at the bar presented a paper to the Mamlutdar Vishnu Raghunath; this was in the month of last July, the exact date I do not know; the Sunnud No. 3, now shown me is the one in question, the Mamlutdar at the time was inquiring as to who had the best right to succeed to the Patelship of Satey.—Dated 18th December 1863.

## No. 2.

I having made solemn affirmation state that my name is Ranojee, my father's name Bhivjee, my age about thirty-five years, I am a Hindu, my caste Koonbee, my profession cultivator, my residence Satey. That prisoner Harry Yesjee is my nephew, I was present in the Mamlutdar's Kutcherry at Kurkalla, when prisoner presented a paper with seals on it to the Mamlutdar, I cannot read, therefore, I cannt identify the paper, the Mamlutdar was at the time enquiring as to who was the proper person to succeed to the Patel of Satey. Prisoner and I live separate. I do not know from whence the prisoner obtained the paper which he gave to the Mamlutdar, prisoner's father died eight or nine years ago.

Dated 18th December 1863.

# जबानी.

## नंबर १.

मी आपल्या धर्माप्रमाणें प्रतिज्ञेवर लिहितों कीं, माझें नांव जानोजी, माझ्या बापाचें नांव गीरजोरजी, माझी उमर सुमारें ४०, माझा धर्म हिंदु, माझी जात कुणबी, माझें कसब शेतकाम, माझी वस्ती खडकाळें. खडकाळें येथील मामलेदार याचे कचेरींत मी हजर होतों तेव्हां कैदी ह्यानें मामलेदार याजपाशीं कांहीं कागद दिले. मामलेदार याचें नांव विष्णु रघुनाथ. गेले जुलाई, महिन्यांत तारीख ध्यानांत नाहीं त्या दिवशीं कागद दिले. निशाणी ३ ची सनद मजला कोडतांतून दाखविली हीच कैदी ह्यानें मामलेदार याजवळ दिलेली आहे, मामलेदार हे त्या वेळेस सातेगांवांस पाटील नेमण्याची तजवीज करीत होते.—तारीख १८ डिसेंबर सन १८६३.

---

## नंबर २.

मी माझे धर्माप्रमाणें प्रतिज्ञेवर लिहितों कीं, माझें नांव राणोजी, माझ्या बापांचें नांव भिवजी, माझी उमर सुमारें ३५, माझा धर्म हिंदु, माझी जात कुणबी, माझें कसब शेतकाम, माझी वस्ती सातें. कैदी हरि येसजी हा माझा खरा पुतण्या आहे. मी खडकाळें येथील मामलेदारकचेरींत हजर होतों त्या वेळेस कैदीनें शिक्क्याचे कागद मामलेदार याजवळ दिले. मजला वाचतां येत नाहीं, सबब ते कागद मी ओळखूं शकत नाहीं. मामलेदार हे त्या वेळेस सातें एथील पाटिलकीचे नेमणुकीची तजवीज करीत होते. कैदी व मी वेगळे राहतों. कैदी ह्यानें मामलेदार ह्याजपाशीं कागद दिले ते त्याजला कोठें मिळाले तें मला माहीत नाहीं. कैदी याचा बाप मयत झाल्यास सुमारें आठ नऊ वर्षे झालीं असतील.

तारीख १८ डिसेंबर सन १८६३.

MY DEAR SIR,

I have had the pleasure to receive your note of the 11th instant, I will lose no time in attending to the commissions it contains. In return may I trouble you to send me from Bombay the following articles.

I trust that none of your family have suffered from the sickness which has preveiled in Bombay lately.

Yours very truly,
A. B.

---

MY DEAR M.,

I have not received a letter from you this long time past, and hope that when you have leisure, you will favour me with a few lines.

May I trouble you also to send me by the Bunghy Post a copy of Walker's Dictionary, the price of which I will remit to you in any way you may direct. If, in return, there is any thing which I can do for you in Surat, I shall be very happy to do it.

Yours very truly,
A. B.

---

To,

The humble petition of A. B., inhabitant of Poona.

Your petitioner begs respectfully to state that he has been serving as a candidate for employment in your office these last fifteen months, but has not yet been so fortunate as to obtain it.

Hearing therefore that in consequence of the retirement of Narsingrao, there is now a vacancy, he ventures to solicit the appointment to it.

---

MY DEAR ANANDRAO,

The letter announcing the successful issue of your examination has just reached us, and but for the bad account of your health which it contains, would have given us very great pleasure.

If you do not soon find yourself better, apply by all means for leave, and return for a time to your native town.

---

The humble petition of A. B.

Your petitioner begs to state that in the year Samvat 1877, he lent Rupees 100 (one hundred) at interest to Narandas Makandas, a Sonee of this town which the said Narandas Makandas now refuses to pay, your petitioner therefore prays the Court will compel him to pay the debt both principal and interest together with the costs which may have been incurred.

चालते महिन्याचे ११ वे तारिखेचें पत्र तुह्मीं पाठविलें तें पोंहचलें. त्यांत ज्या कामाविषयीं लिहिलें आहे तें करण्याविषयीं मजकडून विलंब होणार नाहीं. त्याबद्दल तुह्मांस तसदी देतों, तर खालीं लिहिल्याप्रमाणें जिन्नस मुंबईहून मजसाठीं पाठविण्याची तजवीज व्हावी.

हल्लीं मुंबईंत ज्या रोगाची सांत चालली आहे तिजपासून तुमचे कुटुंबापैकीं कोणास इजा झाली नाहींना ?

---

फार दिवस झाले आपणाकडून पत्र आलें नाहीं, ह्यासाठीं फुरसत मिळेल तेव्हां कृपा करून चार ओळी लिहून पाठवाव्या.

थोडीशी तसदी घेऊन माझ्यासाठीं वाकरचे डिक्शनरीची एक प्रत बंगींतून पाठवून द्यावी आणि तिची किंमत आपण सांगाल त्याप्रमाणें पाठवून देईन. त्याचे मोबदला आपलें एखादें कामकाज सुरतेस माझे हातून होण्यासारिखें असल्यास लिहून पाठवावें.

---

मी अर्ज करितों कीं, खावंदाचे कचेरींत आज पंधरा महिने झाले मी उमेदवारी करित आहें, परंतु दुर्दैवामुळें मला चाकरी मिळाली नाहीं. माझे ऐकण्यांत आलें आहे कीं, नरसिंगरावानें पेनशन घेतल्यामुळें हल्लीं एक जागा रिकामी झाली आहे, तर कृपा करून मला ती द्यावी.

---

तुह्मीं आपली परीक्षा उतरल्याचें पत्र पाठविलें तें आतांच आह्मांस पोंहचलें, परंतु त्यांत आपली प्रकृति बिघडल्याचा मजकूर आहे तो नसता तर आह्मांस फारच संतोष झाला असता.

तुह्मांस आपली प्रकृति लवकर बरी होत नाहीं असें वाटत असलें तर तुह्मीं कसेंही करून रजा घ्या आणि थोडे दिवस आपले गांवीं या.

---

अर्ज करितों, कीं, ह्या शहरांतील सोनार नारणदास मकनदास ह्यास संवत १८७७ सालीं मी शंभर (१००) रुपये व्याजीं दिले आणि हल्लीं नारणदास मकनदास मजकूर देण्यास नाकबूल आहे, तर सदहू मनुष्यास कोर्टांत बोलावून आणवून माझे, व्याज व मुद्दल आणि खर्च झाला असेल त्या सुद्धां सर्व रुपये त्याजकडून मला देववावे.

MY DEAR C.,

I have had the pleasure to receive your letter of the 12th instant and have this morning forwarded the Dictionary according to your request.

The price, Rupees five, you can pay to my cousin Narayanjee who will find means to forward it to me.

Do not scruple whenever you require any thing from Bombay to avail yourself of my services.

---

MY DEAR F.

The books you were kind enough to send me, came safely to hand yesterday.

I have sent the money to your cousin and I am greatly obliged to you for the trouble you have taken.

Yours very truly,
A. B.

---

MY DEAR A.

My brother's wedding is to take place the first week in next month. We hope that you and all your family will favour us with your company on the occasion.

May we trouble you to bring with you * * * * as they are to be got much cheaper in your town than here. All my family desire te be kindly remembered to you.

Yours very truly,
A. B.

---

MY DEAR M.,

We shall spend the day to-morrow at our garden at Katargam and hope that you will oblige us with your company. We shall wait breakfast for you. Favour us with an answer by the bearer.

Yours very truly,
A. B.

---

GENTLEMAN,

Please to advance to N. M. the sum of Rupees 400 on my account.

I have forwarded you by the 'Battela Rooparail' 100 bales of Cotton marked (M. N.), and numbered from one to hundred. You will be good enough to dispose of them and place the proceeds to my credit.

I have the honour to be,
Gentleman,
Bombay, Yours very obedient.

चालते महिन्याचे १२ वे तारखेचें तुमचें पत्र पोंहोचलें आणि तुमच्या लिहिण्याप्रमाणें आज सकाळीं डिक्शनरी पाठविली आहे. तिची किंमत रुपये पांच आमचे चुलतबंधु नारायणजी ह्यांस द्यावे, ह्मणजे ते आह्मांस पोंहचते करतील. जेव्हां तुह्मांस कांहीं जिन्नस मुंबईहून आणवावा लागेल तेव्हां आह्मांस बेलाशक लिहून पाटवावें.

---

तुह्मीं मेहरबानी करून जीं पुस्तकें पाठविलीं तीं काल येऊन सलामत (सुरक्षित) पोंहचलीं.

मी त्यांची किंमत तुमचे भावाकडे पाठविली आहे आणि मजकरितां तुह्मीं फार श्रम घेतले ह्मणून मी तुमचा फार आभारि आहें.

---

पुढच्या महिन्याचे पहिल्या आठवड्यांत माझे भावाचें लग्न ठरलें आहे, तर आपण कृपा करून सहकुटुंब सहपरिवार यावें (मंडप सुशोभित करावा).

आपण येते वेळेस खालीं लिहिल्याप्रमाणें जिन्नस घेऊन यावें. * * * कारण हे जिन्नस एथल्यापेक्षां तुमच्या तेथें स्वस्थ (सवंग) मिळतात. घरांतील सर्वांनीं आपणास फार फार पुसलें आहे.

---

उद्यां आह्मीं कतार गांवीं आमच्या बागेंत जाणार आहों, ह्यासाठीं आपण कृपा करून यावें. प्रातःकाळीं भोजनाकरितां आपली वाट पाहूं. आपणाकडे चिट्ठी घेऊन मनुष्य आला आहे त्याजबरोबर कृपा करून उत्तर पाठवावें.

---

शेटजी,

कृपा करून माझ्या खात्यांत लिहून न. म. ह्यास चारशें रुपये आगाऊ द्यावे.

मी तुह्मांकडे रुपारेल नांवाचे बतेल्यांतून कापसाचे शंभर (१००) गट्ठे पाठविले आहेत. त्यांवर म. न ही निशाणी केली आहे आणि एकापासून शंभर पर्यंत अंक घातले आहेत. ते विकून ऐवज उत्पन्न होईल तो माझे खात्यास जमा करावा.

SIR,

We are going to Dumas to-day and Cavasha is to accompany us. Will you have the goodness then to grant him leave for six days?

Yours very truly,
A. B.

---

MY DEAR R.,

I have not had the pleasure of hearing from you this long time past. I shall be greatly obliged to you if you can send me the books I wrote for in my last letter.

Yours very truly,
A. B.

---

MY DEAR MOHUNLAL,

Have you forgotten the promise you made to write us a full account of your examination? It is over by this time, I suppose, and no doubt you have been successful. I hear that there is a great deal of cholera in Bombay. We have been remarkably free from it this year in Surat though some cases, I am sorry to say, have occurred within the last few days.

All your class-fellows desire to be very kindly remembered to you and long for the arrival of your letter.

Yours very truly,
A. B.

---

MY DEAR SIR,

The moment this reaches you leave home for my house, as I want to speak to you immediately.

---

MY DEAR SIR,

You must excuse my not coming over now, as I am engaged in business, I cannot leave.

---

MY DEAR FRIEND,

Oblige me by sending your „Grammar by the bearer of this," I shall look it over and return it to you in a few days.

Yours,

---

MY DEAR FRIEND,

I have lent my Grammar to a friend. I will send for it, however, and despatch it to you.

आह्मीं आज डुमस येथें जाणार आहों आणि कावशाही आमच्या बरोबर येणार आहे, तर कृपा करून त्यास ६ दिवसांची रजा द्यावी.

---

फार दिवस झाले आपणाकडून पत्र आलें नाहीं. मी पुस्तकांविषयीं पूर्वींचे पत्रांत लिहिलें होतें, त्याप्रमाणें पुस्तकें पाठवाल तर मजवर फार उपकार होतील.

---

भाई मोहनलाल,

तुह्मी आपल्या परीक्षेचें तपशीलवार वर्त्तमान लिहून पाठवूं ह्मणून बोललां होतां, तें तुह्मीं विसरून गेलां काय? परीक्षा तर आतां संपली असेलच आणि तुमची परीक्षा निःसंशय उतरली असेल. मी ऐकतों कीं, हल्लीं मुंबईंत पटकीचा उपद्रव फार चालला आहे. यंदा सुरतेस ह्याचा कांहीं विशेष उपद्रव नाहीं, परंतु थोडे दिवसांपूर्वीं कांहीं मनुष्यें ह्याच्या योगानें गुजरलीं. सर्व तुमचे वर्गांतील मित्रांनीं तुह्मांस फार फार विचारलें आहे आणि ते तुमच्या पत्राची वाट पाहत आहेत.

---

ही चिठ्ठी पोंहचतांच आपण निघून आमचे घरीं यावें. कारण मला कांहीं तुह्मांस सांगावयाचें आहे.

---

मी आतां आलों नाहीं ह्याकरितां क्षमा असावी, कारण कामांत गुंतल्यामुळें येववलें नाहीं.

---

आमचा मनुष्य आपलेकडे चिठ्ठी घेऊन आला आहे, त्याजबरोबर आपलें व्याकरणाचें पुस्तक मेहरबानी करून पाठवावें. तें वाचून थोडे दिवसांत परत पाठवीन.

---

मी आपलें व्याकरणाचें पुस्तक एका मित्रास दिलें आहे, तें मागून आणून तुह्मांकडे पाठवीन.

MY DEAR R. B.,

I have just heard that you are going to Broach this evening, before you leave, give me a call as I have something to send.

Yours very truly,

Girgaum, 1st August 1864. G. L.

---

MY DEAR GUNPUTRAO,

I am not able to give you a call having so much to do in getting my things ready for starting; call you on me or send things and I will deliver them according to address.

Yours truly,

Funnuswady, 1st August 1864. R. B.

---

MY DEAR SIR,

Immediately on the receipt of this, send me two pieces of the finest Dimity you have, and let me know the price thereof.

Yours,

---

MY DEAR SIR,

Agreeable to your request I have sent you the Dimities, each piece will cost Rupees ten.

Yours,

---

MY DEAR DORABJEE,

The letter in which you desire me to sell your books reached me yesterday. I have sold them accordingly and await your instructions as to the disposal of money. Your uncle gives an entertainment next Wednesday at which he hopes to have the pleasure of seeing you and all your family.

Yours truly,
A. B.

---

MY DEAR HARICHUND,

My brother leaves Surat for your town on Saturday next. He will probably arrive about the 15th, and you will greatly oblige us, if you will find a suitable lodging for him. You know, I think the business which brings him there. It will probably detain him about six months. Hoping you will excuse the trouble we give you.

I remain,
Yours truly,
A. B.

मी आतांच ऐकिलें आहे कीं, तुह्मी भडोचेस आज संध्याकाळीं जाणार आहां, तर तुह्मीं जाण्यापूर्वीं मला भेटावें, कारण मला कांहीं पाठवावयाचें आहे.

---

मला तुह्मांस भेटावयास फुरसत नाहीं. कारण पुष्कळ सामानाची बांधावांध करावयाची आहे, ह्मणून तुह्मी माझे येथें या अगर जिन्नस पाठवा, ते पत्त्याप्रमाणें ज्याचे त्यास पावते करीन.

---

ही चिट्ठी पोंहचतांच दुमिटीचे सर्वोत्कृष्ट दोन ताके तुह्मांजवळच असतील ते पाठवून द्या, आणि त्यांची किंमत काय तीही मला कळवा.

---

तुह्मीं लिहिल्याप्रमाणें दुमिटीचे ताके पाठविले आहेत. दर ताक्यास १ रुपये पडतील.

---

दोराबजी शेट,

तुह्मीं आपलीं पुस्तकें विकण्याविषयीं लिहून पाठविलें तें पत्र मला काल पोंहचलें त्याप्रमाणें तीं विकलीं आहेत, त्यांचे पैशाचें काय करावें तें लिहून यावें. पुढच्या बुधवारीं तुमचे चुलत्याचे घरीं भोजनसमारंभ आहे, ह्मणून त्यानें तुह्मांस व तुमचे सर्व कुटुंबास बोलाविलें आहे.

---

भाई हरिचंद,

माझा भाऊ येते शनवारीं सुरतेहून निघून तुमच्या तिकडे येणार आहे. तो बहुतकरून १५ वे तारिखेपर्यंत येऊन पोंहचेल आणि त्यासाठीं एक चांगलें घर पाहून ठेवाल तर मजवर फार उपकार होतील. ज्या कामाकरितां तो येणार तें तुह्मांस माहीतच आहे. तेथें त्याचें बहुतकरून सहा महिने राहणें होईल. तुह्मांस श्रम दिले ह्यासाठीं क्षमा असावी.

SIR,

I was absent yesterday upon urgent business which is not yet finished, will you kindly then give me permission to be absent to-day and mark leave against my name in yesterday's catalogue.

Yours obediently,
A. B.

---

MY DEAR SIR,

Pray favour me with (50) fifty Rupees by the bearer, who is my servant, I have immediate occasion for the sum; but will repay it again whenever you please to make a demand.

---

MY DEAR SIR,

I am exceedingly grieved that it is inconvenient for me to comply with your request, being in urgent want of money myself.

---

MY DEAR SIR,

Do me the favour to accept the accompanying basket of fruits.

---

SIR,

Owing to my sister's marriage this evening, I shall not be able to attend the school to-day, will you therefore kindly excuse my absence?

---

SIR,

My brother Govind is suffering from Diarrhœa and will not be able to attend the Institution, pray excuse his non-attendance.

---

SIR,

As to-morrow is a great Hindu Holiday, I beg you will grant me leave of absence for the day.

---

DEAR FRIEND,

I am glad to learn from your friend Tatya that you have passed a creditable examination and have received a handsome prize in books. I intend giving you a call this evening to introduce to you a friend of mine who came from Poona on Sunday last.

---

DEAR F.,

As my examination is drawing near, I wish to look over the books you have belonging to me, will you please return them per bearer? I shall be glad to let you have the loan of them again some other time.

काल मला जरूरीचें काम होतें ह्मणून मी गैरहजीर होतों आणि तें काम अद्याप शेवटास गेलें नाहीं, ह्यासाठीं कृपा करून आजचे दिवसाची रजा द्या आणि हजिरीपटांत कालची रजा मांडा.

---

आपणाकडे जो चिठ्ठी घेऊन आला आहे तो माझा चाकर आहे. त्या-जवळ मेहरबानी करून ५० रुपये द्यावे. कारण मला फार गरज आहे आणि ते आपण जेव्हां मागाल तेव्हां परत देईन.

---

मलाच पैशाची फार जरूरी आहे ह्यामुळें तुमच्या लिहिण्याप्रमाणें मला पाठवितां येत नाहींत ह्मणून मी फार दिलगीर आहें.

---

आपलेकडे फळफळावळ पाठविली आहे, तर कृपा करून तिचा स्वीकार करावा.

---

आज रात्रौ माझ्या बहिणीचें लग्न आहे ह्याकरितां आज मी शाळेंत येऊं शकत नाहीं, तर कृपा करून मला रजा असावी.

---

माझा भाऊ गोविंद ह्यास हगवणीचा उपद्रव झाला आहे ह्यामुळें त्याच्यानें शाळेंत येववत नाहीं ह्यासाठीं कृपा करून त्याचे गैरहजिरीची माफी असावी.

---

उद्यां हिंदुलोकांचा मोठा सण आहे ह्याकारितां मला रजा असावी.

---

तुमची सर्वोत्कृष्ट परीक्षा उतरली आणि तुह्मांस पुष्कळ पुस्तकें इनाम मिळालीं असें तुमचा मित्र तात्या ह्यानें सांगितलें हें ऐकून मला आनंद झाला. माझा मित्र गेले रविवारीं पुण्याहून आला आहे, त्याचा तुमचा परिचय व्हावा ह्मणून आज संध्याकाळीं तुह्मांकडे माझा येण्याचा बेत आहे.

---

माझी परीक्षा जवळ आली आहे ह्मणून तुह्मांकडे माझीं जीं पुस्तकें आहेत त्यांची आवृत्ति करावी असें माझे मनांत आहे, तर तुह्मांकडे जो मनुष्य पाठविला आहे त्याजबरोबर कृपा करून तीं पुस्तकें परत पाठवावीं आणि दुसरे वेळेस तुह्मांस तीं पाहिजे असल्यास पाठवीन.

SIR,

My mother is going to Pundhurpoor on a pilgrimage and she wants me to accompany her, will you please, therefore, grant me leave of absence for one month from this date?

---

D. F.,

Please go over to the shop of A. B. on your way home and buy me a copy of an English Grammar. The bearer will give you a Rupee for the same. I would not have given you this trouble, if I was well enough to visit the shop.

---

Poona, 31st March 1865.

To,

A. B. & Co.

GENTLEMEN,

Perceiving by your advertisement in the *Bombay Summachar* of the 1st ultimo, that you have at present a vacancy for an accountant in your office, I beg respectfully to offer my services for the same, believing from my ten years' experience in mercantile business that I am fully qualified for the situation. I enclose copies of [illegible] testimonials certifying to my character, knowledge of business, and faithfulness in the discharge of my duties, and I beg to assure you that should you confide in me no effort on my part shall be wanting to give you every satisfaction and to merit your approbation.

I am,

Gentlemen,

Your most obedient and humble servant,

D. D.

---

Kandewady, 17th June 1864.

DEAR BHASKUR,

Monday the 22nd instant being my birth-day and my Papa having kindly allowed me to invite a few friends to a tea party that evening, I shall be very happy if you will join us at 7 o'clock. A friend of Papa's Mr. B. is to show some wonderful things with a magic lantern, so I hope you will not lose this opportunity of beholding the sport.

I am, yours,

माझी आई पंढरपुरास यात्रेकरितां जाणार आहे व तिची आपले बरोबर मला नेण्याची इच्छा आहे, ह्यासाठीं कृपा करून मला आजपासून एक महिन्याची रजा द्याल काय?

---

तुह्मी घरीं येतांना ए. बी. चे दुकानीं जाऊन मला इंग्रजी व्याकरणाची एक प्रत आणा आणि तिची किंमत रुपया १ तुह्मांकडे मनुष्य पाठविला आहे तो देईल. मी दुकानीं जाण्यासारखा बरा असतों तर तुह्मांस हे श्रम दिले नसते.

---

ए. बी. आणि कंपनी यांस, मुक्काम मुंबई,

महाराज,

गेल्या महिन्याच्या १ ल्या तारखेचे मुंबईसमाचार पत्रांतल्या तुमचे जाहिरातीवरून असें कळतें कीं, हल्लीं तुमच्या आफिसांत आकौंटंटची जागा रिकामी झाली आहे, यास्तव ती जागा मला द्यावी ह्मणून मोठे नम्रतेनें आपणास विनंती करितों. मी आज दहा वर्षें व्यापारी कामांत घालविल्या मुळें ती जागा चालविण्याविषयीं मजमध्यें हुशारी आहे असें मला वाटतें. माझी आब्रू आणि कामकाज चालविण्याची हुशारी आणि विश्वासुपणा यांविषयींचीं जीं आब्रूपत्रें मला मिळालीं आहेत त्यांच्या कांहीं नकला या अर्जांत भिडल्या आहेत, आणि आपण मजवर विश्वास टाकला असतां आपली सर्व गोष्टींविषयीं खात्री करून देण्यास व आपल्या पसंतीस उतरण्यास मजकडून कांहीं कमताई होणार नाहीं.

आपला नम्र सेवक,

मुक्काम पुणें, ता० ३० माहे मार्च १८६४. (डि. डी.)

---

रा० भास्कर,

चालते महिन्याचे २२ वे तारखेस सोमवारीं माझा वाढदिवस आहे या करितां माझे तीर्थरूपांनीं ह्या दिवशीं संध्याकाळीं कांहीं मित्रांस चाहा घेण्यास बोलवा ह्मणून सांगितलें आहे; तर तुह्मी ७ वाजतां आमचे येथें आलां असतां मला फार आनंद होईल. आमचे वडिलांचा मित्र बी. "म्याजीक लान्टरन" चे योगेंकरून कांहीं चमत्कार दाखविणार आहे, तो खेळ पाहण्याची संधि आपण दवडणार नाहीं अशी माझी आशा आहे.

कांदेवाडी, ता० १७ जानेवारी १८६४. तुमचा मित्र.

## REPLY.

Girgaum, 18th June 1864.

DEAR J.,

I shall be very glad to join your party on Monday evening and as I have never seen a magic lantern Mr. B. S. will show a great treat to me.

I am, dear J.,
Yours truly,

---

Mr. S. L. presents his best compliments to Mr. A. R. and requests the favour of his company to the marriage ceremony of his daughter which is to take place to-morrow evening at 7 P. M. the ceremony will be performed in Girgaum in the house of Mr. P. W.

7th June 1864.

---

To,
A. C. & Co., Bombay.

GENTLEMEN,

I beg respectfully to offer myself as a candidate for the vacancy which has occurred in your office consequent on the death of Mr. S. P., I have been five years a clerk to F. D. & Co. to whom I can confidently refer you as to my character and qualifications for the duties required. I enclose a copy of my testimonials from H. G. and Co. whom I served four years previous to my joining the present firm.

I hear, that a security of Rs. 1,000 would be required to be given by one who would hold the place, I beg to state, that I have no objections and that I shall not have the least difficulty in giving the required security if the place be conferred on me.

I am,
Gentlemen,
Your

---

SIR,

Herewith I send you Rupees five being the amount for books purchased by me last month. Please acknowledge the receipt.

## उत्तर.

मित्रवर्य रा० जे.,

मी मोठे आनंदानें सोमवारीं संध्याकाळीं आपलेकडे येईन. मी कधीं "म्याजिक ल्यान्टरन" पाहिला नाहीं ह्मणून मिस्तर बी. च्या खेळानें माझें मोठें मनोरंजन होईल.

गिरगांव, ता० १८ जून, १८६४. स० तुमचा मित्र.

---

मिस्तर ए. आर. यांस,

विनंती करितों कीं, उद्यां संध्याकाळीं सात वाजतां गिरगांवांत पी. डब्ल्यू. चे घरीं माझे मुलीचा लग्नसमारंभ आहे यासाठीं आपण कृपा करून तिकडे यावें.

ता० ७ वी जून १८६४. (सही) एस. एल.

---

ए. सी. आणि कंपनी,

महाराज, मुक्काम मुंबई.

आपले आफिसांतील मिस्तर एस. पी. मेल्यामुळें आपलेकडे जागा रिकामी झाली आहे ती मिळावी ह्मणून मी विनयपूर्वक अर्ज करितों, आज पांच वर्षें झालीं मी एफ्. डी. आणि कंपनी यांकडे कारकुनीचें काम करित आहें; तर इकडील कामकाज करण्याची माझी हुशारी व आब्रू यांविषयीं तिकडील साहेबांस लिहून पाठविल्यास ते माझेविषयीं खात्री करतील असा मला पूर्ण भरंवसा आहे. हल्लीं जेथें मी आहें तेथें लागण्याच्या पूर्वीं एच्. जी. आणि कंपनीकडे चार वर्षें चाकरी केली. तिकडील आब्रूपत्रें या अर्जांत भिडविलीं आहेत, मी ऐकितों कीं, या जागेसाठीं हजार रुपयांचा जामीन दिला पाहिजे; तर या गोष्टीविषयीं मला कांहीं हरकत नाहीं आणि मला ही जागा मिळाली असतां जो जामीन पाहिजे तो देण्यास मला कांहीं अडचण पडणार नाहीं.

आपला नम्र सेवक.

---

मी गेल्या महिन्यांत तुह्मांपासून पुस्तकें विकत घेतलीं होतीं त्यांची किंमत रुपये ५ ह्या बरोबर पाठविले आहेत, तर कृपा करून पावल्याबद्दल दोन अक्षरें लिहावीं.

To,

The Secretary of the Prabhu Seminary.

Sir,

Understanding that a vacancy of a situation of a Shastree to your school has occurred, I beg to offer myself as a candidate for the same and enclose my testimonials. While I feel that these can better speak of my qualifications than I can for myself do, I venture to assure you that should you honour me by conferring upon me the vacant appointment, I shall strive to discharge my duties earnestly and steadily and shall ever remain.

Gentlemen,

Yours

Bombay, 12th June 1864.

---

Sir,

On Saturday last, while I was at your reading room you showed me a book entitled the "P. S." which I remember to be a work of so much interest, that I feel much inclined to peruse it throughout and should esteem it a great favour if you would lend it to me. I will take great care of it, and return it in a fortnight. Please send the book with Dadoba who leaves Tanna to-morrow.

I am, Sir,

---

Parell, 10th March 1864.

To,

A. B., Esquire.

Sir,

As I am given to understand that you are at present in want of an English teacher for your children, I beg to acquaint you that I am willing to take up the appointment provided the pay is not less than sixty Rupees per month. I have been for two years in the employment of Mr. C. D., whose children I teach two hours in the evening every day. I can refer you to him as to my character and qualifications. I am a Matriculated Student of the Elphinstone College. The enclosed are the copies of my testimonials.

I remain,

Sir,

Your most obedient servant,

E. F.

प्रभूसिमिनरीचे चिटणीस यांस,

महाराज,

आपल्या शाळेंत शास्त्र्याची जागा रिकामी झाली आहे, असें ऐकिल्या-वरून अर्ज करितों कीं, ती आपण कृपा करून मला द्यावी. या अर्जांत मी आपलीं आब्रपत्रें भिडवलीं आहेत. मी स्वतां बोलावें त्यापेक्षां हीं पत्रेंच माझे हुशारीविषयीं आपली चांगली खात्री करतील असें मला वाटतें. जर ही जागा द्याल तर मी हें काम मोठ्या उत्कंठेनें व लक्षपूर्वक चालविण्याविषयीं मेहनत करीन.

मु० मुंबई, ता. १२ जून, १८६४. सही.

---

महाराज,

गेल्या आदितवारीं मी तुमचे वाचावयाचे खोलींत असतां "पी. स." ह्मणून जें पुस्तक आपण मला दाखविलें त्याची मला आठवण आहे व तें वाचावयास इतकें गोड आहे कीं, सर्व वाचावें अशी माझी मनीषा झाली आहे; ह्मणून जर तें दोन दिवस कृपा करून द्याल तर मजवर मोठा उपकार हो[redacted] दिलें असतां मी त्यास फार जपेन आणि पंधरवड्यांत परत करीन. ठाण्याहून उद्यां दादोबा येणार आहे त्याबरोबर तें पुस्तक कृपा करून पाठवावें. तुमचा मित्र,

---

ए. बी. इस्कायर यांस,

महाराज,

आपल्या मुलांस इंग्रजी शिकविण्याकारितां एक शिक्षक पाहिजे आहे असें कळल्यावरून आपल्यास विनंतीपूर्वक कळवितों कीं, दरमाहा ६० रुपये पर्यंत मिळाले असतां मी ती जागा पतकरण्यास खुषी आहें. मी मिस्तर सि. डी. कडे दोन वर्षें नौकरी करीत आहें आणि त्याचे मुलांस संध्याकाळीं दोन तास शिकवीत असतों, पाहिजे तर आपण माझी आब्रू आणि हुशारी यांविषयीं त्यां-कडे चौकशी करावी. माझी एलफिन्स्तन कालेजांत माट्रिक्युलेशनची परीक्षा उतरली आहे त्याबाबदच्या आब्रूपत्रांच्या नकला या पत्रांत भिडल्या आहेत.

तुमचा नम्र सेवक.

मुक्काम परळ, ता० १० मार्च १८६४.

## PETITION FOR ADMISSION IN A SCHOOL.

To,

A. B.,

Superintendent of Institution.

The humble petition of

C. D.

Most humbly sheweth,

That your petitioner is by caste a Brahmin. That he has a to whom *his* great desire is to give an English education, but ha means of satisfying it; as his income is hardly sufficient to mair his family. That your petitioner under these circumstances, most humbly to lay his poor state before you and request yo admit his son in your School free of monthly fee and provide with necessary books that your petitioner entertains every hope f what he has heard of the great interest you take in the caus Education that you would comply with his request.

And your petitioner,

as in duty bound shall ever pray.

C. D.

## NOTICE PREVIOUS TO RESIGNATION.

A. B., Esquire,

Superintendent Office.

SIR,

As I have prospects of obtaining a better paid situation in new Financial Association, I beg to give you one month's notice, tl I shall not be able to attend to my present duties from the 2 Proximo. I beg to request you therefore to accept my resignati and grant me a certificate.

I beg to take this opportunity to express my feelings of than fulness to you for your kind treatment during all the time I ha served under you.

I beg to remain,

Sir,

## APPLICATION FOR LEAVE.

To,

The Head Master of School.

SIR,

As my son, or grandson or nephew is suffering from fever headache or indigestion &c. since last night or this morning, I be you will kindly mark him sick in the catalogue.

Yours obedient,

To,

O fice.

SIR,

I beg to inform you that I am suffering from fever or headache &c. since last night or this morning.

I hope therefore that you will kindly excuse me for my absence from the office to-day.

Sir, yours

## A RECEIPT FOR RENT.

Colaba, 5th April 1864.

Received from A. B. the sum of Fifty Rupees for one quarter's rent of house Assessment No. 8 Girgaum road due 31st March 1864.

A. R.

Rs. 50

## A RECEIPT IN FULL OF ALL DEMAND.

Received from A. B. the sum of Twenty-five Rupees, ten annas and six pies being in full of all demands to the present time.

A. S.

## RECEIPT FOR BORROWED MONEY.

Received and borrowed from A. B. the sum of (110) one hundred and ten Rupees the Current money of Bombay at the interest of three-quarters per cent. per month which sum I promise to pay by monthly instalment of Rupees ten.

Witness. Signed.

## FORM OF BILL.

A. B. ——————————— Dr.

To,

| | | | |
|---|---|---|---|
| 5 Chairs at 2¼ Rs. .......................... | 12 | 8 | 0 |
| 2 Tables at 10 „ .......................... | 20 | 0 | 0 |
| Rs... | 32 | 8 | 0 |

Bombay, 18th April 1864.

E. E. & Content Received.

A. R.

## ABBREVIATIONS OF MERCANTILE TERMS.

A/c. a/c. Account.
Cr. Creditor.
Dr. Debtor.
Ditto, do. The same.
E. E. Errors Excepted.
I. O. U. I owe you.
Inst. Instant, present month.
Proxo. Proximo, next month.
Ulto. Ultimo, last month.
D/d. Days after date.
D/s. Days after sight.
M/d. Month after date.
O/a. On account of.
O/o. Per cent.
@. At.
B/l. Bill of lading.
L/c. Letter of credit.

---

## FIGURES AND NUMBERS.

| | *Arabic.* | *Roman.* |
|---|---|---|
| One | 1 | I. |
| Two | 2 | II. |
| Three | 3 | III. |
| Four | 4 | IV. |
| Five | 5 | V. |
| Six | 6 | VI. |
| Seven | 7 | VII. |
| Eight | 8 | VIII. |
| Nine | 9 | IX. |
| Ten | 10 | X. |
| Eleven | 11 | XI. |
| Twelve | 12 | XII. |
| Thirteen | 13 | XIII. |
| Fourteen | 14 | XIV. |
| Fifteen | 15 | XV. |
| Sixteen | 16 | XVI. |
| Seventeen | 17 | XVII. |
| Eighteen | 18 | XVIII. |
| Nineteen | 19 | XIX. |
| Twenty | 20 | XX. |
| Twenty-one | 21 | XXI. |
| Twenty-five | 25 | XXV. |
| Thirty | 30 | XXX. |
| Forty | 40 | XL. |
| Fifty | 50 | L. |
| Sixty | 60 | LX. |
| Seventy | 70 | LXX. |
| Eighty | 80 | LXXX. |
| Ninety | 90 | XC. |
| One hundred | 100 | C. |
| Two hundred | 200 | CC. |
| Three hundred | 300 | CCC. |
| Four hundred | 400 | CCCC. |
| Five hundred | 500 | D. |
| Six hundred | 600 | DC. |
| Seven hundred | 700 | DCC. |
| Eight hundred | 800 | DCCC. |
| Nine hundred | 900 | DCCCC. |
| One thousand | 1000 | M. |

One Thousand Eight Hundred Twenty-Three 1823, MDCCCXXIII.

FINIS.